वंकिम साहित्य-माला - १२

# देवी चौधुराणी

[ संक्षेपित आवृत्ति ]



: लेखक :

बंकिमचंद्र चट्टोपाध्याय

: अनुवादक-संक्षेपक :

भा. वि. वरेरकर

नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई ४.

# प्रस्तावना

१८७८ सालच्या ऑगस्ट महिन्यांत बंकिमचंद्रांचें 'कृष्णकांताचें मृत्युपत्र' प्रसिद्ध झालें. यानंतर कांहीं दिवसांनीं एका कौटुंबिक आपत्तीमुळें त्यांच्या जीवनांत विशेष प्रकारचा बदल झाला, त्यामुळें केवळ कलात्मक अशा कथा कादंबऱ्या लिहिण्याचें त्यांनी सोडून दिलें.

१८८२ पासून १८९४ सालीं त्यांना मृत्यु आला त्यावेळेपर्यंत त्यांनीं फक्त तीन कादंबऱ्या लिहिल्या. आनंदमठ १८८२, देवी चौधुराणी १८८४, सीताराम १८८७. त्यांनीं पूर्वी लिहिलेल्या कोणत्याही कथा कादंबरीपेक्षां या तीन कादंबऱ्यांची रचना अगदीं वेगळ्या प्रकारची होती. कांहीं तरी विशिष्ट उद्देश मनांत योजून या कादंबऱ्या लिहिल्या होत्या.

आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत ज्या 'अनुशीलनतत्त्व' या विषयाला घेऊन त्यांनीं सारखी चर्चा चालवली होती, त्याच तत्त्वाच्या प्रचारासाठीं त्यांनीं या तिन्ही कादंबऱ्यांचा उपयोग करून घेतला असावा. 'अनुशीलन-तत्त्वाच्या प्रचाराचें एक अधिष्ठान' म्हणून आपण या कादंबऱ्या लिहिल्या असें त्यांनींसुद्धां एके ठिकाणीं म्हटलें आहे. या तिन्ही कादंबऱ्यांना 'बंकिमचंद्राची त्रयी' या नांवानें प्रसिद्धी देण्यांत आली आहे.

बंकिमचंद्रांच्या या 'त्रयी' वर आजवर ज्या ज्या आलोचना झाल्या आहेत त्यांत बिपिनचंद्र पाल आणि पाचकोडी बंद्योपाध्याय यांच्या आलोचना विशेष प्रकारें उल्लेख योग्य आहेत. या आलोचना नारायण आणि वंगवाणी या मासिकांतून प्रसिद्ध झाल्या होत्या. पाचकोडी बाबूंच्या प्रबंधांत 'देवी चौधुराणी' बद्दल असा उल्लेख आहे:—

"देवी चौधुराणी या कादंबरीस बंकिमचंद्रांनी त्यांच्या culture किंवा अनुशीलनतत्त्वाच्या साहाय्यानें एक विशिष्ट मानव निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे, त्यावेळीं Ground किंवा चित्राचें क्षेत्र उभारण्याचा प्रयत्न चांगलाच परिस्फुट झालेला आहे. देवी चौधुराणीचें क्षेत्र अतिसुंदर नसलें तरी

मनोहर खास आहे. देवी चौधुराणी म्हणजे वैष्णवानें घडविलेली शक्तिमूर्ति—कमला नव्हे, भैरवी नव्हे, कालीही नव्हे—पण या तिहींच्या समन्वयानें घडवलेली एक अपूर्व वैष्णवी."

जाजपूरहून बदली झाल्यावर बंकिमचंद्र १८८३ च्या फेब्रुवारी महिन्यांत हावड्याला डेप्युटी मॅजिस्ट्रेट या नात्यानें आले. जाजपूरलाच देवी चौधुराणीच्या रचनेचा श्रीमन्महा झाला. याचवेळीं त्या भागांत एक दरोडा पडल्याचा उल्लेख शचीशचंद्रांच्या बंकिमचरित्रांत आहे त्यावरूनच त्यांना ही देवी चौधुराणीची कल्पना सुचली. त्यावेळीं हावड्याला असलेल्या वेस्टमेकॉट या नांवाच्या चीफ मॅजिस्ट्रेट बरोबर बंकिमचन्द्राचें पटत नव्हतें. कलकत्त्यांत बऊबझार स्ट्रीट मधल्या एका घरांत राहून ते हावड्याला नोकरीसाठीं जात असत. संजीवचंद्रांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या वंगदर्शन मासिकाची हलाखीची स्थिति होऊन तें बंद पडलें होतें, त्याचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं बऊ बझारमधल्या घरांत राहून ते देवी चौधुराणीची रचना करीत होते. पण त्याच्या या प्रयत्नाला यश आलें नाहीं. पुन्हां 'वंगदर्शन' सुरू झालें आणि पुन्हां चार महिन्यांनी बंद पडलें. तेवढ्या मुदतींत देवी चौधुराणीचे दोनच खंड प्रसिद्ध झाले होते. वेस्टमेकॉट साहेबाच्या हुकुमाला मान देऊन बंकिमचंद्रांना हावड्याला येऊन रहावें लागलें आणि तिथेंच त्यांनी या कादंबरीच्या द्वितीय खंडांत बरीचशी सुधारणा केली. पुढें १८८४ सालीं ही कादंबरी पुस्तक रूपानें प्रसिद्ध झाली.

स्वतः बंकिमचंद्रांनी या कादंबरीचा इंग्रजी अनुवाद केला होता. त्या हस्तलिखितांतील जेवढा कांही भाग सांपडला तेवढाच त्यांच्या इंग्रजी ग्रंथावलींत प्रसिद्ध करण्यांत आला आहे. १८९३ सालीं अमृतसरचे तुलसीराम आणि १९०९ सालीं लखनौचे जे. प्रसाद यांनी या कादंबरीचा हिंदी अनुवाद प्रसिद्ध केला आहे. मद्रासचे व्ही. अम्मल यांनी 'देवी चंद्रप्रभा' असें नांव देऊन याचा तामीळ अनुवाद केला आहे. १९०९ सालीं मसुलीपट्टमचे सी. भास्करराव यांनी केलेला तेलगु अनुवाद आणि १८९९ सालीं म्हैसुरचे डी. व्यंकटाचार्य यांनी केलेला कन्नड अनुवाद प्रसिद्ध झाला आहे. भारत गौरव ग्रंथमालेंतून वासुदेव गोविंद आपटे यांनी केलेला मराठी अनुवाद सुप्रसिद्ध

आहे, पण त्याही पूर्वी वाईच्या कादंबरीकल्पद्रुम मासिकांतून सुमारें १९०७-८ सालींही एक मराठी अनुवाद प्रसिद्ध झाल्याचें आठवतें.

या कादंबरीच्या प्रस्तावनेंत स्वतः बंकिमचंद्रानीं असें लिहिलें आहेः—

" देवी चौधुराणीचा कांहीं भाग वंगदर्शन मासिकांत प्रसिद्ध झाला होता. यावेळीं संपूर्ण ग्रंथ प्रकाशित होत आहे.

" आनंदमठ कादंबरीला कांहीं ऐतिहासिक आधार आहे कीं नाहीं, असें ही कादंबरी प्रसिद्ध झाल्यावर मला पुष्कळांनी विचारलें. संन्याशांचें बंड ऐतिहासिक खरें, म्हणून वाचकांना त्याबद्दल विशेष स्वरूपांत सांगण्याची आवश्यकता वाटली नाहीं. ऐतिहासिक कादंबरी लिहिण्याचा माझा उद्देश नव्हता, अर्थात् ऐतिहासिकतेचें ढोंग मी केलें नाहीं. आतां पुष्कळसें ऐकल्यावर आणि पाहिल्यावर ' आनंदमठ ' कादंबरीच्या ऐतिहासिकतेचा पुढील आवृत्तींत थोडाबहुत परिचय द्यावा असें ठरविलें आहे.

" देवी चौधुराणीलाही असेंच एक ऐतिहासिक मूळ आहे. हंटर साहेबांनी संकलित केलेल्या आणि सरकारनें प्रसिद्ध केलेल्या बंगालच्या Statistical account मध्यें रंगपूर जिल्ह्याचा जो ऐतिहासिक वृत्तांत आला आहे, तो जिज्ञासूंनी अवश्य पहावा. ही कथा फारशी मोठी नाहीं पण या कादंबरींतील देवी चौधुराणी आणि ती देवी चौधुराणी यांचा संबंध अगदींच तुटपुंजा आहे. देवी चौधुराणी, भवानी पाठक, गुडलॅंड साहेब, लेफ्टनंट ब्रेनन हीं नांवें मात्र ऐतिहासिक आहेत. त्याचप्रमाणें नौकेंत राहणारी देवी, बरकंदाज, सैन्य प्रभृति कथाही ऐतिहासिक आहेत—एवढेंच.

" आनंदमठ आणि देवी चौधुराणी या दोन्ही कादंबऱ्यांना वाचकांनी कृपा करून ऐतिहासिक कादंबरीच्या सदरांत न घातलें तर माझ्यावर उपकार होतील. "

— भा. वि. वरेरकर

# प्रथम खंड

## — १ —

" ए. पी.—अग ए पी पी—अग प्रफुल्ल—अग मेले काळतोंडे ! "

" आलें आई ! "

आईनें हांक मारली—मुलगी आली अन् म्हणाली, " काय आई ? "

आई म्हणाली, " जा ना, घोषांच्या घरीं जा अन् एक वांगं मागून आण. "

प्रफुल्लमुखी म्हणाली, " मी जायची नाहीं. मला शरम वाटते मागायची. "

" मग खाणार काय ? आज घरांत तर कांहींच नाहीं. " आई म्हणाली.

" नुसताच भात खाईन. रोज रोज कुणाकडे तरी मागून कशाला खायचं तें ? "

" जसं नशीब घेऊन आलीस, तसं भोग आतां. कंगाल गरीबांना मागायची लाज कसली ? "

यावर प्रफुल्ल कांहीं बोलली नाहीं. आई म्हणाली, " तूं भाताला आंधण ठेव. मी कांहींतरी कालवणाची तजवीज पाहातें. "

" माझी शपथ आहे तुला आई, " प्रफुल्ल म्हणाली " आतां कुणाकडे हात पसरायला जाऊं नकोस. घरांत तांदूळ आहेत, मीठ आहे, परसांत ओल्या मिरच्या आहेत.—नायकांच्या जातीला हें काय थोडं झालं ? "

प्रफुल्लची आई तें ऐकून थांबली. चुलीवर आंधणाला चढवून ती तांदूळ धुण्यासाठीं गेली. तांदूळ धुण्यासाठीं रोळी हातीं घेऊन ती म्हणाली, " कुठं आहेत ग तांदूळ ? " तांदूळ पुरते मूठभरसुद्धां नव्हते. एक माणूससुद्धां अर्धपोटीं राहिलं असतं. हातीं रोळी घेऊन आई बाहेर निघाली तेव्हां प्रफुल्ल म्हणाली, " कुठं चाललीस ? "

"तांदुळ उसने आणतें कोणाकडून तरी." आई म्हणाली, "नाहीतर नुसता भात तरी कसा तोंडी जाणार?"

"किती तांदूळ उसने आणले लोकांकडून?" प्रफुल्ल म्हणाली, "अजून ते परत दिले नाहींत. आतां तूं उसने मागायला जाऊं नकोस."

"दळभद्रे, कार्टे, मग खाशील काय?" आई म्हणाली, "घरांत एक दमडीसुद्धां नाहीं."

"मी उपास करीन."

"उपास करून किती दिवस जगशील?"

"नाहींतर मरेन."

"मी मेल्यावर काय तें कर. तूं उपास करून माझ्या नजरेसमोर मेल्याचं मला पाहवणार नाहीं. कुठून तरी कांहींतरी भीक मागून आणून तुला खायला घालीन."

"भीक कशाला मागायची?" प्रफुल्ल म्हणाली, "एक दिवसाच्या उपासानं कांहीं माणूस मरत नाहीं. चल आतां, मायलेकी बसून सूत कांतून जानवीं करूं या."

"सूत कुठाय? चरका आहे खरा, पण फण्या कुठायत?"

तेव्हां प्रफुल्लमुखी मान खालीं घालून रडूं लागली. आई हातांत रोळी घेऊन तांदूळ उसने आणायला निघाली असें पाहून तिच्या हातची रोळी काढून घेऊन प्रफुल्ल म्हणाली, "उसनं आणून कशाला खायचं? माझ्या घरीं तर सारं कांहीं आहेना?"

डोळे पुसून आई म्हणाली, "सारं कांहीं आहे खरं पोरी, पण नशिब आडवं येतंय ना?"

"कां आडवं येतं? सासुरवाडीला घरीं भरपूर असतांना मला तें कां मिळूं नये? असा काय अपराध केला आहे मी?"

"या अभागिनीच्या पोटीं आलीस हाच तुझा अपराध—आणि दुसरं तुझं नशिब."

"प्रफुल्ल म्हणाली, "आतां ऐक आई. आज मी अगदीं निश्चय केला आहे—सासुरवाडीचं अन्न मिळालं तरच जेवायचं! तूं उसनंपासनं आणून

घांसभर खाऊन घे आणि मला बरोबर घेऊन सासुरवाडीला नेऊन सोडून दे."

"असं कसं होईल पोरी?" आई म्हणाली, "बोलावण आल्याशिवाय का सासरघरीं जायचं? ते कांहीं तुझं नांव निशाण काढित नाहींत—"

"नाहीं का काढिनात?" प्रफुल्ल म्हणाली, "त्यांत कसला मान आणि अपमान? माझा भरणपोषणाचा भार ज्यांच्यावर आहे त्याच्याकडे पोटाला मागण्यासाठीं हात पसरण्यांत अपमान कसला? तुला एकटी टाकून माझ्यानं जाववत नाहीं. पण माझा हा बोजा कमी झाला तर तुझाही भार हलका होईल एवढ्यासाठींच मी जाईन म्हणतें."

यानंतर मायलेकींचीं बरीचशीं खलबतें झालीं. आईला मुलीचें म्हणणें पटलें. होते तेवढे मूठभर तांदूळ टाकून तिनं भात केला पण प्रफुल्ल त्याला शिवली नाहीं. अर्थात् आईनेंही कांहीं खाल्लें नाहीं.

दोघीही अशाच उपासपोटीं जायला निघाल्या.

— २ —

वरेंद्रभूम जिल्ह्यांत भूतनाथ नांवाचं एक गांव होतं. प्रफुल्लमुखीची तीच सासुरवाड. तिचा सासरा हरवल्लभबाबू एक बडा जमीदार होता. दोन मजली घर, ठाकूरवाडी, नाटमंदीर, दफ्तरखाना, बागबगीचा, तळें वगैरे सर्व कांहीं यथास्थित होतें. प्रफुल्लमुखीच्या माहेरापासून हें गांव सहा कोस होतें. एवढें मोठें अंतर पायदळीं तुडवीत आई आणि मुलगी तिसऱ्या प्रहरीं उपासपोटीं त्या जमीदाराच्या दाराशीं येऊन पोंचली. आंत जायला प्रफुल्लच्या आईचा पाय पुढं पडेना. गरीबाची मुलगी म्हणून कांहीं प्रफुल्ल टाकली गेली नव्हती. हरवल्लभबाबूंनी कळून सवरून गरीबाची मुलगी पत्करली होती. इतकी सुंदर मुलगी दुसऱ्या कुठें आढळली नाहीं म्हणूनच त्यानें हें लग्न जमविलें होतें. थोरामोठ्यांच्या घरीं मुलगी पडते आहे असें पाहून होतें नव्हतें तें विकून तिनें तिचें लग्न लावून दिलें होतें. तेव्हांपासून ती अन्नाला मोताद झाली.

नशिबानें उलट खाल्ली. जे कांहीं थोडेंबहुत होतें तेंही जाऊन पदरीं अपेश आलें. वऱ्हाडी लोकांचा जो कांहीं मानपान व्हायचा त्यांत उणीव आल्यामुळें ते तुटून गेले. तोंडातोंडी झाली आणि त्याच्यापायीं गांवच्या शेजारी लोकांनीं तिचा सूड घ्यायचें ठरविलें.

गांवजेवणासाठीं हरवल्लभनें विहिणीच्या शेजाऱ्यांना बोलावणें केलें तेव्हां त्यांनी यायचें नाकारलें. एकजणाबरोबर त्यांनीं निरोप पाठविला, कीं जातिभ्रष्ट कुलटेबरोबर हरवल्लभबाबूनें हवी तर सोयरीक करावी—मोठ्या माणसांना सर्व कांहीं शोभतें—पण आम्ही गरीब माणसें, आमची जातच आम्हाला मोठी. जातिभ्रष्टेच्या कन्येचा स्पर्श झालेलें अन्न आम्ही ग्रहण करणार नाहीं.

शेवटीं व्हायचें तें झालें. त्या जेवणावळीला कुणी आलें नाहीं. हरवल्लभ बाबूंनीं वधूला माहेरी पाठवून दिलें आणि मुलाचें दुसरें लग्न लावून दिलें. म्हणूनच आज त्या घरांत पाऊल टाकायला प्रफुलच्या आईला धीर होत नव्हता.

आतां आलों खरे, परत जायचें कसें, म्हणून जिवाचा धडा करून त्या दोघीही घरांत गेल्या. त्यावेळीं घरधनी अंतःपुरांत वामकुक्षी करीत होते. सासूबाई पाय सोडून बसून पिकलेले केस निवडून काढित होती. इतक्यांत या दोघी आल्याचें पाहून तिनें विचारलें, " कोण हो तुम्ही ? "

" कोण म्हणून सांगूं ? " प्रफुल्लची आई म्हणाली, " आम्ही आपलींच कुटुंबी माणसं."

तारेची आई म्हणून एकजण मोलकरीण तिथें होती. तिनें त्यांना ओळखलें. ती म्हणाली " खरंच कीं विहिणबाई का ? अहो या दुर्गापुरच्या विहीणबाई तुमच्या मोठ्या मुलाची मोठी सासू. "

सासूबाईनी तोंड वाकडें करून नुसतें 'बसा' म्हणून म्हटलें. तिनें विचारलें, " ही कोण हो मुलगी ? "

" तुमची थोरली सून. " आई म्हणाली.

सासुबाई क्षणभर उगीच राहिली. नंतर तिनें विचारलें, " कुठं आलां होतां इकडे ? "

" इथंच आलों होतों. "

" तीं कशाला ? "

" हें काय बोलणं झालं ! माझ्या मुलीनं सासरीं येऊं नयेच का ? "

" असं कुणी म्हटलं ? " सासूबाई म्हणाली, " सासू सासरे आणतील तेव्हां यायचं. सभ्य घरचीं पोरंबाळं काय असा गळेपडूपणा करतात ? "

" सासू सासऱ्यांनी सात जन्म नांव काढलं नाहीं तर काय करावं पोरीनं ? " आईनें विचारलें.

"नांव काढीत नाहींत तर यायचं कशाला ?" सासूबाई म्हणाली.

"हिला पोसायचं कुणी ? मी अनाथ विधवा. तुमच्या मुलाच्या बायकोला मी काय म्हणून पोसावं ?"

"एक पोर पोसायची ताकद नव्हती तर पोरीला जन्म कां दिला ?"

"भरणपोषणाचा हिशोब करूनच का तुम्ही आपल्या मुलाला जन्म दिला होता ?" प्रफुल्लची आई म्हणाली.

"असं का बाई ?" सासुबाई म्हणाल्या, "मेली आमच्या घरीं येऊन वाद घालायला पाहते आहे."

"नाहीं हो बाई. मी वाद घालायला आलें नाहीं." प्रफुल्लची आई म्हणाली, "तुमच्या सुनेला एकटं येतां येत नव्हतं म्हणून सोबत करायला आलें. तुमचं माणूस तुमच्याकडे पोचवलं. आतां मी चाललें." असें म्हणून ती घराबाहेर पडली. बिचारीच्या पोटांत अजूनही अन्नपाणी गेलें नव्हतें.

आई गेली पण प्रफुल्ल गेली नाहीं. ती तशीच बुरखा ओढून पुढें उभी राहिलेली पाहून तिला म्हणाली, "आई गेली ना तुझी ? आतां तूंही जा."

प्रफुल्ल हलली नाहीं. "अजून गेली नाहींस ?" तरीही प्रफुल्ल हलली नाहीं! "आतां काय म्हणाव ? कुणी माणूस बरोबर देऊन तुला पोचवायला हवी का ?" असें सासुबाईनें म्हटलें तेव्हां प्रफुल्लनें माथ्यावरचा पदर मागें सारला.

किती सुंदर चेहरा ! डोळ्यांतून पाण्याच्या सारख्या धारा लागल्या होत्या. सासुबाई जरा मनांतल्या मनांत म्हणाली, 'कशी शुक्राच्या चांदणीसारखी पोर ! कशी लाभली नाहीं ही मला !' सासुबाई जरा नरम आली.

प्रफुल्ल पुटपुटत म्हणाली, "जावं म्हणून आलें नाहीं मी."

सासुबाई म्हणाली, "काय करायचं बाई ? तुला कांहीं घरांत घेतां यायचं नाहीं. चार लोक चार प्रकारें बोलतात, वाळींत टाकूं म्हणतात म्हणून तर तुला टाकावी लागली."

"वाळींत टाकतील म्हणून पोटचं लेकरूं कुणी दूर का लोटतात आई ? मी तुमचं लेकरूंच ना !"

सासुबाईचें मन आणखीही नरमलें. ती म्हणाली, "काय करायचं पोरी, जातीची भीति आहे ना ?"

प्रफुल्ल तशीच पुटपुटत म्हणाली, " असेन मी जातिहीन—तुमच्या घरांत शूद्र लोक मोलकरणी म्हणून वावरतात ना, मलाही तशीच समजून ठेवून घेतलीत तर दोष कसला ? "

यापेक्षां अधिक वाद घालावा असें सासुबाईंना वाटलें नाहीं. ती म्हणाली, " लक्ष्मीसारखी पोर—दिसायलाही तशी. बोलायलाही तशी. घरधनी काय म्हणतात तें एकदां जाऊन पाहतें. आतां तूं इथंच बैस पोरी. "

प्रफुल्ल खालीं बसली होती इतक्यांत दाराच्या आडून एक चौदा वर्षांची सुंदर मुलगी बाहेर डोकावून पाहून हातानें खुणावून तिला बोलावूं लागली. प्रफुल्लला वाटलें, ही आणखी कोण ? ती उठून तिच्यापाशीं गेली.

## — ३ —

इकडे सासुबाई हालत डोलत आपल्या पतिराजाकडे गेल्या. ते नुकतेच झोंप घेऊन उठले होते. त्यांच्याकडे जाऊन ती म्हणाली, " आज एक भानगड झालीय. ती सांगायला आलेंय—" अशी प्रस्तावना करून तिनें प्रफुल्ल आणि तिची आई आल्याबद्दलची सारी हकीगत त्याना सांगितली. सुनेच्या रूपाची तिनें तोंडभरून तारीफ केली पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

घरवाले चिडून म्हणाले, " काय तरी दिमाख ! ती म्हारड्याची पोर माझ्या घरीं येते ! झाडू मारून बाहेर काढ तिला. "

सासुबाई म्हणाल्या, " छे छे ! असं कुणी बोललंय ? कांहीं झालं तरी ती आपल्या मुलाची बायको—ती महाराची पोर कशी ? चारचौघांनीं ऐकलं तर काय म्हणतील ?—"

तिनें आपल्या परीनें बरेंच सांगितलें, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ते सारखे ' महाराच्या पोरीला झाडू मारून बाहेर काढ ' असें म्हणून ओरडत होते.

शेवटीं सासूबाई रागारागानें म्हणाल्या, " झाडू मारायची असली तर तुम्ही मारा ! यापुढं मी तुमच्या घरच्या कामांत तोंड घालायची नाहीं. " असें म्हणून ती रागानें तणतणत बाहेर गेली. प्रफुल्ल जिथें होती त्या जागीं ती येऊन पहाते तों प्रफुल्ल तिथें नाहीं.

प्रफुल्ल कुठें गेली तें आधीं सांगितलेंच आहे. त्या खोलींत प्रवेश केल्याबरोबर त्या मुलीनें दार बंद करून घेतलें. दार बंद कां केलेंस, म्हणून प्रफुल्लनें विचारलें, त्यावेळीं ती म्हणाली, "कुणी यायला नको. मला तुझ्याबरोबर बोलायचं आहे."

प्रफुल्लनें विचारलें, "तूं कोण ग ?"

ती म्हणाली, "माझं नाव सागर."

"कोण ग तूं ? मला ओळखतेस का ?"

"मी तुझी सवत. मी दाराआडून ऐकत होतें."

प्रफुल्ल म्हणाली, "म्हणजे तूं इथली गृहिणी म्हणायची ?"

"चल हॅत् !" सागर म्हणाली, "मला गृहिणी म्हणतेस ती मी काय काळी आहें, कीं माझे दांत बाहेर आलेयत ?"

"कुणाचे दांत बाहेर आलेयत ?"

"तीच ग बाई या घरची घरवाली ! माहित नाहीं तुला ? खरंच ! तुला कसं माहित असेल ? तूं कधीं आलीच नाहींस इथं ! माझी आणखी एक सवत आहे तें माहित नाहीं का तुला ?"

"मला वाटलं होतं, तूंच एक माझी सवत."

"नाहीं ग बाई, आतांच तीन वर्षांपूर्वी मी आलें इथें."

"ती अगदीं कुरुप आहे वाटतं ?"

"नुसती कुरूप ? नुसती पाहिलीत तर डोळ्यापुढें अंधेरी येईल." सागर अगदीं हलक्या आवाजांत बोलत होती, "पण ती कुरूप म्हणून कांहीं मला आणली नाहीं. माझ्या बापाची संपत्ति पुष्कळ आहे. अन् मी बापाची एकुलती एक मुलगी—म्हणून त्या पैशाच्या लोभानं—"

"कळलं !" प्रफुल्ल म्हणाली, "तरी पण तूं सुंदर आहेस ! मी असं विचारतें, कीं ती कुरूप आहे ना ? मग ती घरची घरवाली कशी झाली ?"

"मी आहें माझ्या बापाची एकुलती एक मुलगी. ते कांहीं मला इकडे पाठवीत नाहींत. माझ्या सासऱ्याशीं माझ्या बापाचं बनत नाहीं, तेव्हां इथं मी फारशी असतच नाहीं. केव्हां सणासुदिनाला मला इथें बोलावतात. आतां चार दोन दिवसापूर्वी मी आलें होतें. आतां जाणार आहें."

प्रफुल्लला वाटलें, सागर मोठी छान मुलगी. म्हणून सवत असली तरी तिला तिचा राग आला नाहीं. तिनें विचारलें, " मला कशाला बोलावलंस ? "

सागर म्हणाली, " खाशील का थोडं कांहीं ? "

प्रफुल्ल हंसली आणि म्हणाली, " ही काय खायची वेळ ? "

सागर म्हणाली, " तुझं तोंड कसं सुकून गेलंय. एवढा रस्ता चालून आलीस, भूकतहान लागली असेल, कुणी तुला एका शब्दानं म्हटलं नाहीं, कीं दोन घांस खा म्हणून—म्हणून मी बोलावलं तुला. "

त्यावेळपर्यंत प्रफुल्ल उपाशी होती. तहानेनें तिचा घसा कोरडा पडला होता. तरीही ती म्हणाली, " मामंजींची समजूत घालायला सासूबाई गेल्या आहेत. माझ्या नशिबीं काय आहे तें आधीं कळल्याशिवाय मी यांच्या घरचं कांहीं खायची नाहीं. खायचीच असली तर झाडू ! झाडू यांच्या हातची. "

" छे छे यांच्या घरचं नकोच खाऊंस. " सागर म्हणाली, " माझ्या माहेराहून आणलेले संदेश आहेत—अगदीं छान आहेत—" असें म्हणून तिनें कांहीं संदेश आणले आणि तिच्या तोंडांत कोंबले.

सागरनें तिला थंड पाणी पाजलें. तें प्यायल्यावर प्रफुल्ल ताजीतवानी झाली. ती म्हणाली, " माझा आत्मा थंड झाला, पण तिकडे माझी आई उपाशी मेली असेल. "

" कुठं गेली आहे तुझी आई ? "

" कोण जाणे ! असेल कुठंतरी रस्त्यांत. "

" तर मग असं करतें. ब्रह्मवन्संना त्यांच्याकडे पाठवतें.—वन्सं म्हणजे आमच्या सासूबाईंच्या वन्सं. त्या असतात याच घरांत. त्या तुझ्या आईला खायला घालतील. "

" या घरचं अन्न माझी आई केव्हांही तोंडांत घालणार नाहीं. "

" चल हट् ! " सागर म्हणाली, " तें काय मला कळत नाहीं ? कुठल्यातरी ब्राह्मणाच्या घरीं ती करील व्यवस्था. "

प्रफुल्ल म्हणाली, " तुला काय वाटेल तें कर. माझ्या आईचे हाल माझ्यानं कांहीं पाहवत नाहींत. "

सागर तिथून निघाली ती तडक ब्रह्मवन्संकडे गेली. तिनें सारी हकिकत

ब्रह्मवन्सना सांगितली. तेव्हां ती म्हणाली, " काय ग बाई तरी ! गृहस्थाच्या घरांत बाई उपाशी रहाते ? अकल्याण होईल ! "

ब्रह्म प्रफुल्लच्या आईच्या शोधांत निघाली. तेव्हां सागरनें येऊन प्रफुल्लला ती व्यवस्था केल्याचें सांगितलें.

प्रफुल्ल म्हणाली, " आतां काय सांगत होतीस तें सांग. "

सागर म्हणाली, " सांगायचं काय ? मी कांहीं इथें रहात नाहीं—राहतां येत नाहीं. माझ्या नशिबानं मी झालेंय निर्माल्यांतलं फूल. ताजं तवानं आहे, पण देवाला वहातां येत नाहीं. तूं आतां आली आहेस ती तूं कसंही करून रहाच. तें काळं घुबड नको आमच्या नजरेसमोर. "

" राह्यचं म्हणूनच आलेंय. पण काय होतं कोण जाणे ! "

सागर म्हणाली. " असं पहा, मामंजींनी नको म्हटलं, तरीही इथून जाऊं नकोस. "

" न जाऊन काय करूं ? " प्रफुल्ल म्हणाली, " कशासाठीं राहूं ? तशी राहीन पण—तूं जर माझ्या जन्माचं सार्थक करशील तर. "

" तें कसं काय ? " सागरनें विचारलें.

प्रफुल्ल गालांतल्या गालांत हंसली. तिचें हंसूं थांबलें आणि डोळयावाटें रडूं आलें. ती म्हणाली, " कळलं नाहीं तुला ? "

आतां सागरच्या डोक्यांत प्रकाश पडला. तिनें थोडा वेळ विचार केला, एक सुस्कारा सोडला आणि ती म्हणाली, " काळोख पडल्यावर तूं येऊन याच खोलींत बसून रहा. दिवसा तर त्यांची भेट व्हायची नाहीं. "

ती त्या वेळची रीत होती, आजची नव्हे. ही कथा आहे शंभर वर्षांपूर्वीची. अगदीं अलिकडेसुद्धां बायकांना दिवसा नवऱ्याचें दर्शन घडत नसे.

प्रफुल्ल म्हणाली, " माझ्या नशिबीं काय आहे तें मला कळलंय. पण त्याचं एकदां निराकरण करून घेतें अन् मग तुला भेटतें. कसंही का असेना, एकदां माझा नवरा काय म्हणतो तें ऐकायचं आहे मला. " असें म्हणून ती बाहेर गेली.

तिची सासू तिला शोधीत होती. प्रफुल्लला पाहतांच ती म्हणाली, " कुठं होतीस पोरी ? "

प्रफुल्ल म्हणाली, " एकदां घर पाहून घेत होतें. "

सासूबाई म्हणाली, " तुझंच ग बाई हें घर. पण काय करायचं ? तुझे मामंजी कांहीं होय म्हणत नाहींत."

प्रफुल्लच्या मस्तकावर वज्राघात झाला. ती मटकन् खालीं बसली. ती रडत नव्हती—गप्प बसली होती. सासुबाईला तिची दया आली. तिला वाटलें, कीं पुन्हां एकदां नथ उडवून प्रयत्न करून पहावा, पण तसें कांहीं बोलून न दाखवतां ती म्हणाली, " आज आतां कुठं जाशील तूं ? आज रहा इथंच. उद्यां सकाळीं जा."

## – ४ –

काळोख पडल्यावर त्या खोलींत सागर आणि प्रफुल्ल या दोघीही दार बंद करून घेऊन खालच्या आवाजांत बोलत होत्या. इतक्यांत कुणीतरी येऊन दारावर थाप मारली. सागरनें विचारलें, " कोण तें ?"

" मी ती."

सागर प्रफुल्लला हळूच डिवचून पुटपुटली, " बोलूं नकोस. काळं घुबड आलंय."

बाहेरून प्रश्न आला, " कोण आहे ग आंत ? बोलत कां नाहींस ? सागर सुनबाईसारखा आवाज आला होय ?"

" कोण आहे तें ?" सागर म्हणाली, " न्हावीण सूनबाईसारखा आवाज वाटतोय."

" जळलं मेलीचं तोंड ! मी न्हावीण का ?"

" मग कोण तू ?"

" तुझी सवत ! सवत ! ! सवत ! ! ! नयान सुनबाई !"

तिचें नांव होतें नयनतारा, पण लोक तिला म्हणत ' नयान.'

घाबरल्याचा आंव आणून सागर म्हणाली, " कोण ? दिदी ! अगबाई ! तूं कशी न्हावीण सूनबाईसारखी असशील ? ती कितीतरी गोरी आहे."

नयन उद्गारली, " जळलं मेलीचं तोंड ! मी काय तुझ्यापेक्षां काळी आहें होय ? कसली मेली सवत—चौदा वर्षांची नसतीस म्हणजे सांगितलं असतं तुला."

" चौदा वर्षांची असलें म्हणून काय झालं ? तुझं वय आहे सतरा. मी आहें तुझ्यापेक्षां देखणी—आणि तरणी देखील ! "

" पण ही देखणी तरणी बापाच्या घरीं बसल्याबसल्या घांस गिळते आहे कशाला ? जाऊं दे. मी एक विचारायला आलें होतें तुला. "

" मग विचार ना ? "

" तूं दार उघडीत नाहींस अन् मी विचारूं कशी ? या कातरवेळीं दार कशाला लावलंयस ? "

" बरं का ग बाई, मी हळूंच चोरून संदेश खातेंय ! तूं नाहीं खात ? "

" मग खा खा तर ! " नयन म्हणाली, " मला आधीं असं सांग, कुणी एकजण आलंय का ? "

" आणखी एकजण कोण ? पतिराज ? "

" तूं मेलीस मेले ! आणखी एकजण असतात का पतिराज ? "

" असते तर बरं झालं असतं. " सागर म्हणाली, " दोघींनी दोन वांटून घेतले असते. "

" चल. भलतंच कांहीं बोलूं नकोस. " नयन म्हणाली, " मी आधीं विचारतें तें सांग—सासूबाईंची एक सून आलीय का ? "

" आणखी कुठली सून ? "

" ती चांभारीण ! "

" चांभारीण ? "

" चांभारीण कीं महारीण ! असेल कुणीतरी ! आमची एक महारीण सवत आहे. "

" तुझ्याशिवाय आणखी ? तुझ्याशिवाय दुसरी महारीण कोण ? "

" भारी दुष्ट आहेस तूं ! अग ती !—ती पहिली ! "

" ती तर चांगली ब्राह्मणाची मुलगी आहे. "

" कसली ब्राह्मणाची मुलगी ! ब्राह्मणाची असती तर इथं नांदली नसती का ?"

" उद्यां जर तुला घालवून दिली अन् मला घेऊन संसार थाटला, तर तूं महारीण होशील का ? "

" तूं काय म्हणून मला शिव्या देतेस काळतोंडे ? "

सागर म्हणाली, “तूं का त्या बिचारीला शिव्या देतेस ग काळतोंडे ?”

“जा, मर एकदांची !” नयन म्हणाली, “मी सासूबाईंना जाऊन सांगतें, कीं बड्या माणसाची मुलगी म्हणून दिमाख चढून तूं वाटेल तें बोलतेस म्हणून.” असें म्हणून नयनतारा हातपाय आपटीत जाऊं लागली असें पाहून सागरनें तिला हांक मारली आणि म्हटलें, “नाहीं दिदी, मागं फीर. मी चुकलें. मागं फीर. हें पहा दार उघडतें.”

नयनतारेला राग आला होता खरा, पण तसें पाहिलें तर ती निघून जायला तयार नव्हती. सागर गुपचूप किती संदेश खाते आहे तें तिला पाह्यचें होतें म्हणून ती मागें फिरली. खोलींत येऊन पहाते तों—संदेश नव्हते—आणखी एकजण—तिनें विचारलें, “ही ग कोण ?”

सागर म्हणाली, “प्रफुल्ल.”

“म्हणजे कोण ?”

सागर म्हणाली, “चांभारीण.”

नयन म्हणाली, “हीच का ती सुंदरी ?”

“तुझ्यापेक्षां खास नव्हे !” सागर म्हणाली.

“हें बघ, मला चिडवूं नकोस.” नयन म्हणाली, “तुझ्यापेक्षां सुंदर तर नव्हेच नव्हे.”

— ५ —

त्या रात्रीं मालक जेवायला बसले होते. गृहिणी हातांत पंखा घेऊन माशा हांकलीत होती. त्यांनीं जेवतां जेवतां विचारलें, “ती महाराची पोर गेली का ?”

गृहिणी म्हणाली, “रात्रीं कोण कुठं जाईल ? रात्रीच्या वेळीं पाहुणा आला तर तुम्ही त्याला घालवून देत नाहीं अन् मी माझ्या सुनेला काय म्हणून घालवून देऊ ?”

“पाहुणी असली तर दे पाठवून तिकडे अतिथीशाळेंत. इथं कशाला ?”

गृहिणी म्हणाली, “घालवून द्यायची असली तर तुम्ही द्या घालवून. सोन्यासारखी नाजूक सुंदर सून—”

“महाराचांभारांतसुद्धा एकादी सुंदर पोर निपजते.” मालक म्हणाले, “बरं बरं, आतां मीच पहातों. त्या व्रजला बोलाव पाहूं.”

एक नोकराणी व्रजेश्वरला बोलवायला गेली. तो त्यांचा मुलगा. वय वर्षे सुमारें बावीस. फार देखणा होता तो! बापासमोर येतांच अदबीनें उभा राहिला. त्याला बोलायची छाती होत नव्हती. तो आलेला पाहतांच हरवल्लभबाबू म्हणाले, "कायरे, तुझ्या तीन बायका आहेत त्याची आठवण आहे ना!" व्रज चूप राहिला, "तुझी पहिली बायको—ती महाराची पोर ना?" तरी व्रज बोलला नाहीं. त्या काळांत मुलगा बावीस वर्षांचा झाला तरी आणि तो कितीही धारदार असला तरी बापासमोर बोलायची त्याची छाती नसे. मालक बोलत होता, "ती महारड्याची पोर इथं आली आहे. ती बैठक मारून बसली आहे. तुझ्या आईला मी सांगितलं, कीं झाडू मारून तिला घालवून दे म्हणून! बायकांच्या अंगावर बायकांनीं कधीं हात टाकलाय? हें आहे तुझं काम—तुझा अधिकार—दुसरा कोण हात लावील तिला? आजच्या आज तिला झाडू मारून घराबाहेर काढ. नाहींतर रात्रीं मला झोंप यायची नाहीं."

गृहिणी म्हणाली, "नाहीं रे बाबा, बायकांच्या अंगावर हात टाकूं नये. माझं कुणी ऐकत नाहीं. हे सांगतील तें ऐकायलाच हवं. आतां असं कर. तिला समजावून रवानगी कर तिची."

"बराय." असें म्हणून व्रजेश्वर जात असतांना थांबला. तितक्यांत गृहिणी घरवाल्यांना म्हणाली, "सुनेला तुम्ही घालवून देतांहां. तिनं आतां जगावं कसं?"

"काय वाटेल तें करावं." मालक म्हणाले, "चोरी करावी, दरोडेखोरी करावी, नाहींतर भिक्षा मागावी."

गृहिणी व्रजेश्वरला म्हणाली, "तिला घालवून देतांना हें सांग बरं का? तिनं विचारलं होतं मला."

व्रजेश्वर तिथून निघाला तो सरळ ब्रह्मआत्याच्या खोलींत गेला. ती हातांत माळ घेऊन जप करीत होती आणि त्याचवेळीं डांस मारीत होती. व्रजेश्वरनें तिला हांक मारली तेव्हां ती म्हणाली, "काय रे हें?"

"एक नवीन खबर आहे." व्रजेश्वर म्हणाला.

"आणखी नवीन नवीन तें काय?" ब्रह्म म्हणाली, "सागरनं माझा चरखा मोडला, हेंच ना? पोरवय आहे.—चाललंच आहे! चरका फिरवतांन

मोडला असेल—जाऊं दे. तिला कांहीं बोलूं नकोस. तुम्ही जगलां वाचलांत तर शंभर चरके घेऊन येईन मी, म्हातारी माणूस मी, दोन जानवीं कांतून भटजींना देतें—मोडला असेल चरका—"

व्रजेश्वर म्हणाला, "आधीं माझं ऐकून घे. नाहींतर जो आणशील तो चरका मीच मोडून टाकीन. मी चरक्याची तक्रार घेऊन नाहीं आलों !—माझ्या दोन ब्राह्मणी आहेत तें माहित आहे ना तुला ?"

"ब्राह्मणी होय ?" ब्रह्म म्हणाली, "आई ! आई ! आई ! जशी ती नयन तशीच ती सागर—सारख्या माझीं हाडं खातात—कहाणी सांग, कहाणी सांग, कहाणी सांग.—इतक्या कहाण्या मी आणूं कुठून ? कहाण्या सांगून थकलें आणि शेवटीं विहंग विहंगमीची कथा सांगितली-माहित आहे ती तुला ? ऐक तर, एका वनांत एक मोठा वटवृक्ष होता. त्याच्यावर एक विहंग आणि एक विहंगमी रहात होती—"

व्रज म्हणाला, "राहूं दे ती तुझी कहाणी. आधीं माझी कहाणी ऐक. माझ्या दोन बायका आहेत अन् एक आहे ती महारीण. महारीण म्हणे आज आली आहे—होय ?"

"इडापिडा टळो !" ब्रह्म म्हणाली, "महारीण कशी ? चांगली ब्राह्मणाची मुलगी आहे."

"पण आली आहे ती ? होय ? कुठं आहे ती ? एकदां दाखवशील का मला ?"

ब्रह्म म्हणाली, "छान ! मी तुला दाखवूं ? अन् तुझ्या आईबापांचा राग ओढवून घेऊं ? त्यापेक्षां ही माझी कहाणी ऐक."

"कांहीं भ्यायला नको माझ्या आईबापांना !" व्रजेश्वर म्हणाला, "त्यांनीं मला सांगितलंय तिला झाडू मारून घालवायला.—पण ती सांपडलीच नाहीं तर घालवून देऊं कशी ? तूं माझी आत्या, म्हणून तुला विचारायला आलोंय."

"हें बघ बेटा, मी म्हातारी, आपली रामकृष्णाचं नांव घेऊन पेज पिऊन रहातें. हवी तर कहाणी सांगतें तुला. तुझी ती महारीणही मला माहित नाहीं आणि ब्राह्मणीही माहित नाहीं. जा तुझ्या त्या सागरसुनबाईकडे."

"तिच्या सवतीकडे ?"

"तूं जा ना !" ब्रह्म म्हणाली, "सागर गेलीय तिला घेऊन आपल्या खोलींत. असली अजब मुलगी नाहीं कुठं सांपडायची."

" तिथं गेलों तर ती म्हातारीण सांपडेल मला ? "

" म्हातारीचं सांगणं ऐकावं. " ब्रह्म म्हणाली, " अशा चांभारचौकशा करूं नयेत. माझा जप तसाच राहिला त्यामुळें. भारी चेंगट झालायस तूं. त्या नयनतारेलाच सांगतें आतां. "

— ६ —

व्रजेश्वर तिथून निघाला तों माडीवरच्या सागरच्या खोलींत गेला. तिथें सागर नव्हती. तिच्याऐवजीं दुसरीच कुणीतरी एक होती. तो मोठ्या संकटांत पडला. हीच आपली पहिली बायको असावी असें त्याला वाटलें. लग्नाची नवराबायको, परस्परांचे अर्धांगी, जगांतलें सर्वापेक्षां अधिक जवळचें नातें, तरी-पण कधी पाहिली नव्हती कीं बोलीभाषा झाली नव्हती. त्याला वाटलें, सुरवात कशी करावी ? आधीं कुणी बोलावें ? विशेषतः एकजण झाडू द्यायला आला होता आणि दुसरी झाडू खायला आली होती.

सुरवातीला दोघेंही एकमेकांकडे टकमक पहात राहिलीं होतीं. कुणीच बोलत नव्हतें. शेवटीं प्रफुल्ल नाजुक नाजुक हंसत गळ्यांत पदर घेऊन व्रजेश्वरसमोर आली आणि तिनें धपकन् त्याच्या पायावर घालून घेतलें. व्रजेश्वर कांहीं आपल्या बापाच्या वळणावर गेला नव्हता. तिनें प्रणाम करतांच तो ओशाळला. तिच्या दोन्हीं दंडांना धरून त्यानें तिला वर उठवलें आणि पलंगावर बसवलें. तो स्वतः तिच्या शेजारीं बसला.

प्रफुल्लच्या तोंडावर पदर ओढलेला होता, पण तिला धरून बसवतांना तो बाजूला सरला.

व्रजेश्वरनें पाहिलें, तों प्रफुल्ल रडत होती. तिच्या डोळ्यावाटे टपटप आसवें गळताहेत असें पाहून—छे छे ! काय हें ! कसें सांगायचें इथें ?–व्रजेश्वरनें चटकन् तिचें चुंबन घेतलें.

हा अजब प्रसंग घडून आला तोंच दारांतून कुणीतरी आंत डोकावलें. मोठा सुंदर होता तो मुखडा. सुंदर सुंदर कुरळे कुरळे केंस माथ्यावर ओढलेल्या पदराखालून डोकावत होते. कमलपत्रासारखे दोन डोळे—तोंडल्यासारखे ते दोन ओंठ—गालाला खळ्या घालून हंसत होते. व्रजेश्वरनें वळून पाहिलें, तो मुखडा होता सागरचा. तिनें तिथूनच नवऱ्याला एक कुलूप आणि किल्ली दाखवली.

पोरवय होतं तिचं—नवऱ्याबरोबर बोलणार कसं ! व्रजेश्वरला तिची खूण कळली नाहीं. पण तें कळायला अधिक वेळ लागला नाहीं. सागरनें बाहेरून दार बंद करून घेतलें, बाहेरूनच दाराला कडी लावली, कुलुप घातलें, किल्ली फिरवली आणि ती काढून घेऊन ती दुडदुड पळत निघून गेली. कुलुप पडल्याचा आवाज ऐकून व्रजेश्वर ओरडला, " हें काय ? हें काय सागर ! "

त्याच्या हांकेला ' ओ ' न देतां सागर जी पळत गेली ती ब्रह्मआत्याकडे जाऊन तिच्या पांघरुणांत शिरली.

ब्रह्म म्हणाली, " काय ग, काय झालंय् ? इथं येऊन कां निजलीस ? व्रजनं तुला हांकलून दिली का ? बर, बरं, नीज. आतां बोलावील तो पुन्हां ! काय सांगूं तुला, तुझा ठाकूरदादा सुद्धां मला असा तीस दिवस आणि बारा महिने हांकलून देत असे आणि मग बोलावीत असे—आणि मीही राग धरून बसत नसें. किती झालं तरी बायको माणसाचा जीव !—राहावतच नसे ग ! एक दिवस काय झालं... "

सागर म्हणाली, " एक कहाणी सांग ना मला. "

" कुठली सांगूं ? विहंग-विहंगमीची ! एकटीच ऐकणार आहेस का ? ती नवी सुनबाई कुठय् ? बोलाव ना तिला. दोघंही ऐकाल. "

" ती कुठंय् ती सांपडतच नाहीं मेली. सांगा तुम्ही. मी एकटीच ऐकतें. "

ब्रह्मआत्यानें कहाणी सांगायला सुरवात केली अन् लगेच सागरनेंही झोंपायला सुरवात केली. कांहीं वेळ कहाणी सांगून झाल्यावर सागर झोंपी गेली आहे हें जेव्हां म्हातारीच्या ध्यानीं आलें तेव्हां मोठ्या निराशेनें तिनें गोष्ट अर्ध्यावरच बंद केली.

दुसऱ्या दिवशी पहांट व्हायच्यापूर्वीच सागरनें खोलीचें कुलूप काढलें. तो आवाज ऐकतांच प्रफुल्ल उठून उभी राहिली आणि म्हणाली, " सागरनं कडी काढली आहे. मीं चाललें. स्त्री म्हणून नव्हे, पण दासी म्हणून तरी माझी आठवण ठेवा. "

" इतक्यांत जाऊं नकोस. " व्रज म्हणाला, " मीं एकदां बाबांना सांगून पहातों. "

" तुम्ही सांगितल्यानं मन बदलेल का त्यांचं ? "

" न का बदलेना ! मीं माझं कर्तव्य करणार. " व्रज म्हणाला, " निष्कारण तुझा त्याग करून मीं कां अधर्मात पडूं ? "

" तुम्ही त्याग केला नाहीं माझा—स्वीकार केलाय. " प्रफुल्ल म्हणाली, " एक दिवसापुरता मला आपल्या शय्येवर आसरा दिलात तेवढंच पुरेसं झालंय मला. माझ्यासारख्या अभागिनीसाठीं तुम्ही बापाशीं वाद घालूं नका एवढंच माझं मागणं ! "

" निदान त्यांनीं तुझ्या भरणपोषणाची तरी व्यवस्था केली—"

" ज्यांनीं माझा त्याग केलाय त्यांच्या घरची भिक्षा मीं घेणार नाही. " प्रफुल्ल म्हणाली, " तुमची स्वतःची कांहीं कमाई असेल तर मीं तुमच्या हातची भीक घेईन. "

" माझं असं म्हणायला कांहीं नाहीं. " व्रज म्हणाला, " ही एवढी एक आंगठी आहे. ही घेऊन ठेव. एवढ्यानं तुझं तात्पुरतं काम भागेल. त्यानंतर मीं स्वतः कांहीं रोजगार मिळतो का पाहीन. काय वाटेल तें करून तुझं भरणपोषण करीन. " असें म्हणून त्यानें आपल्या हातांतली आंगठी काढून तिच्या ओटांत घातली. तेव्हां प्रफुल्ल म्हणाली, " तुम्हांला माझा विसर पडला तर ? "

" सर्वांना विसरेन पण तुला विसरणार नाहीं. " व्रज म्हणाला.

" आणि माझी ओळख पटली नाहीं तर ? "

" हा चेहरा मीं केव्हांच विसरणार नाहीं. "

प्रफुल्ल म्हणाली, " ही आंगठी मीं विकायची नाहीं—उपाशी मेलें तरी विकायची नाहीं. माझी ओळख जेव्हां तुम्हांला पटणार नाहीं तेव्हां तुम्हांला ही आंगठी दाखवीन. "

दोघांनीही भरल्या डोळ्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला. प्रफुल्ल खालीं आली त्यावेळीं सागर आणि नयन यांची तिची भेट झाली. नयननें तिला विचारलें, " काल रात्रीं कुठं झोंपली होतीस ? "

प्रफुल्ल म्हणाली, " तीर्थयात्रा घडली तर ती आपल्या तोंडानं सांगूं नये. "

" म्हणजे काय ? " असें नयननें विचारलें तेव्हां सागर म्हणाली, " तुला नाहीं का कळलं ? काल हिनं मला घालवून दिलं अन् ही विष्णूची लक्ष्मी होऊन बसली आणि त्या भामट्यानं लाडांत येऊन हिला आंगठी दिखील दिलीय् बघ. "

प्रफुल्लच्या हातांतील आंगठी पाहून नयनतारेच्या अंगाचा भडका झाला. ती म्हणाली, "मामंजींनीं तुला काय उत्तर दिलंय तें ध्यानांत आहे ना दिदी. ते म्हणाले, पोटाला मिळालं नाहीं तर चोरी दरोडेखोरी कर!"

"पाहूं काय होतं तें!" असें म्हणून प्रफुल्ल निघाली. ती दिंडीदरवाजांतून जात असतां सागर तिच्या मागोमाग गेली. तिला प्रफुल्ल म्हणाली, "आज मीं चाललें. पुन्हां या घरांत पाऊल टाकणार नाही. तूं माहेरीं गेलीस कीं तिथं तुला भेटेन."

"ठीक आहे." सागर म्हणाली, "अवश्य ये माझ्या माहेरीं. तुझी आई बागेच्या दारांत तुझी वाट पहातेय्."

— ७ —

मायलेकी घरीं आल्या. प्रफुल्लच्या आईला शारीरिक कष्टांपेक्षांही मानसिक कष्ट दुःसह झाले होते. ती आली ती तापानें पडली. आधीं ताप फार नव्हता, पण ब्राह्मणाच्या घरची बाई—त्यांतून विधवा, तापाला ताप न म्हणतां राबत होती, दोनवेळ स्नान करीत होती, अन्नाचा अभाव तसाच होता. शेजाऱ्या-पाजाऱ्यांनीं कांहीं आणून दिलें तर तेवढेंच मिळायचें. हळूहळू तिनें बिछाना धरला. आधीं त्या गांवांत कुणी वैद्य नव्हताच, शिवाय विधवा बायका कधीं औषध घेत नाहींत. वैद्याला बोलावून आणील म्हणायला प्रफुल्लचें असें दुसरें कोण होतें? ताप वाढला, त्रिदोष झाला, शेवटीं बिचारी साऱ्या दुःखांतून मोकळी झाली.

गांवांतल्या ज्या चार लोकांनीं तिचें नांव बदनाम केलें होतें त्यांनींच येऊन शेवटीं तिचा सत्कार केला. अशा वेळीं बंगाली माणूस शत्रूला मानीत नाहीं. प्रफुल्ल एकटीच होती. गांवचे चार लोक येऊन म्हणाले, "आतां तिचं श्राद्ध केलं पाहिजे." प्रफुल्ल म्हणाली, "पण पिंडदान घडायचं कसं? पैसे कुठून आणूं?"

गांवच्या चार लोकांनीं तो भार आपल्या अंगावर घेतला. कुणी रोख पैसे दिले. कुणी सामानसुमान दिलें. अशाप्रकारें कसेंबसें श्राद्ध आणि ब्राह्मण-भोजन उरकलें.

श्राद्धाच्या वेळीं प्रफुल्लच्या सासऱ्याला आमंत्रण द्यायचा प्रश्न निघाला पण तें द्यायचें कुणी? गांवांत कांहीं खटपटे लोक होते, ते पुढें आले आणि त्यांनीं जाऊन हरवल्लभला निमंत्रण दिलें.

ते गेले तेव्हां हरवल्लभनें विचारलें, " माझ्या विहिणीला तुम्हीच वाळींत टाकलं होतं ना भटजी ? आतां कुठल्या तोंडानं मला बोलावतां ? "

भटजी म्हणाले, " अहो ! हें चालायचंच. शेजाऱ्याशेजाऱ्यांत भांडणं निघालीं, कीं उगीच बदनाम करीत असतात. तें हिशेबांत घ्यायचं नसतं. "

हरवल्लभ संसारी माणूस. त्याला वाटलें, ही सारी लबाडी आहे या लोकांची. त्या बेट्या म्हारणीनें पैसे चारले असतील यांना ! — पण या म्हारणीकडे पैसा आला कुठून ? तात्पर्य काय, कीं तें निमंत्रण देऊन या लोकांनीं आपल्याला डिवचलें म्हणून ते तिच्या बाबतींत अधिकच चिडले.

ही हकीकत व्रजेश्वरच्या कानीं गेली. एकाद्या दिवशीं रात्रीं हळूच लपून छपून जाऊन प्रफुल्लला भेटायचें आणि रातोरात परत यायचें असें त्यानें ठरवलें.

शेजारी निराश होऊन परत आले. प्रफुल्लनें यथासाध्य शेजाऱ्यांच्या मदतीनें श्राद्ध आणि ब्राह्मणभोजन उरकून घेतलें. व्रजेश्वर मात्र जायच्या संधीची वाट पहात राहिला.

— ८ —

फुलमणी न्हावीण हिचें घर प्रफुल्लच्या शेजारींच होतें. आईच्या मृत्युनंतर घरीं एकटेंच राहाणें योग्य नव्हे असा विचार करून प्रफुल्लनें फुलमणीला आपल्या घरीं बोलावलें. आईच्या मृत्यूनंतर फुलमणी रोज तिच्या घरीं येऊन झोपत असे. फुलमणीचें चारित्र्य बिचाऱ्या प्रफुल्लला माहीत नव्हतें. ती प्रफुल्लपेक्षां दहा वर्षांनी मोठी होती. ती दिसायला ठाकठीक होती आणि पोशाखही नीटनेटका करीत असे. आधीं हलक्या कुळांतली, त्यांतून बाल-विधवा ! बिचारीचें चारित्र्य निर्मळ कसें राहाणार ? ह्या गांवचा जमीदार प्राण चौधरी हा होता. त्याचा एक गुमास्ता दुर्लभ चक्रवर्ती वसुलीच्या कामासाठीं मधून मधून या गांवीं येत असे. त्याचा आणि फुलमणीचा संबंध होता, असें लोक म्हणत. ही गोष्ट प्रफुल्लच्या कानीं आली नव्हती असें नाहीं, पण ती काय करणार होती ? आपलें घरदार सोडून तिच्या घरीं रात्रींची सोबत करायला यायला दुसरें कोण येणार होतें ?

श्राद्धाच्या दुसऱ्या दिवशीं फुलमणी आली ती थोडासा उशीर करूनच. वाटेंत ती एका आंबराईत गेली. तिथें दुर्लभ तिची वाट पहात होता.

फुलमणी मोठ्या उत्साहानें आली आहे, असें पाहून त्यानें विचारलें, " कुठपर्यंत आलं काम ? "

फुलमणी म्हणाली, " आजचीच वेळ बरी आहे. मध्यान्हरात्रीं डोली घेऊन या अन् दारावर थाप मारा. मीं दार उघडीन. उगीच गडबड करूं नका हो ! मीं हळूच दार उघडीन. तुम्ही हळूच आंत या आणि ती झोपलेली असेल, तिच्या तोंडावर फडका टाकून तिला बांधून टाका. "

दुर्लभ म्हणाला, " अशी जबरदस्तीनं नेली तिला तर ती किती दिवस राहील ? "

" एकदां घेऊन गेलांत कीं झालं. " फुलमणी म्हणाली, " अन्नाला मोताद झालेली पोर ! ती सुखाला लागेल. कपडालत्ता—दागदागिने पैसाअडका मिळेल. मग कां राह्यची नाहीं ? पण माझा भाग मात्र विसरूं नका हो. "

दुर्लभ गेल्यावर फुलमणी प्रफुल्लच्या घरीं आली. रोजच्यासारखी प्रफुल्ल झोंपायच्यापूर्वी आईची आठवण काढकाढून रडली आणि रोजच्यासारखीच रडत रडत झोंपी गेली.

ठरल्याप्रमाणें रात्रीं दुर्लभ आला आणि प्रफुल्लच्या तोंडांत बोळा देऊन तिला पकडून जमीदार प्राणबाबूंच्या विलासमंदिरांत घेऊन गेला. फुलमणीही तिच्याबरोबर गेली.

यानंतर बरोबर अर्ध्या घंट्यानें व्रजेश्वर प्रफुल्लला भेटायला आला आणि घर मोकळें पडलें आहे असें पाहून निराश होऊन परत गेला.

ते दिवस अराजकाचे होते. मुसलमानांचें राज्य गेलें होतें आणि इंग्रजांच्या राज्याचें बस्तान नीटसें बसलें नव्हतें. त्यानंतर देवीसिंहची भानगड. एडमंड-बर्कनें वेस्ट मिनिस्टर हॉलमध्यें देवीसिंहाच्या अत्याचारावर खळबळ उडविणारें भाषण करून जसें त्याला अमर केलें होतें, तसेंच श्रोत्यांना थक्क करून सोडलें होतें.

रंगूनचा पहिला कलेक्टर म्हणून गुडलॅड साहेब आला होता. फौजदारी कामें त्याच्याच हातीं होतीं. त्यानें डाकूंना धरून पकडण्यासाठीं शिपाई पाठवावे आणि ते कांहीं न करतां परत यावे, असें चाललें होतें. प्रफुल्लला घेऊन जातांना

दुर्लभला भीति वाटत होती ती ही, कीं डोली पाहिली तर डाकू चाल करून येतील. म्हणून त्यानें भोयांना गुपचुप जायची तंबी दिली होती.

अशा रीतीनें भीत भीत चार कोस रस्ता काटला. त्यानंतर एक मोठें जंगल लागलें. भोयांनीं पाहिलें तों समोरून एक माणूस येत होता. रात्रींची वेळ, नुसता नक्षत्रांचा प्रकाश, त्यामुळें नीटसें दिसत नव्हतें. समोरून एक नव्हे, दोन माणूस येत आहेत असें पाहून भोई घाबरले. दुर्लभही घाबरला. तितक्यांत त्या दोघांनीं येऊन त्यांना हटकलें, "कौन है रे ?"

ती साद ऐकतांच डोली खालीं टाकून भोई जंगलांत पळाले. दुर्लभ देखील त्यांच्या मागोमाग धावला. तेव्हां "मला टाकून कुठं चाललांत ?" असें म्हणून फुलमणीही त्यांच्या मागोमाग धांवत गेली.

जे दोघे आल्यामुळें हीं दहा माणसें भिऊन पळालीं होतीं ते नुसते वाटसरू होते. ते दिनाजपुरला सरकारांत नोकरी मिळविण्यासाठीं जात होते. भोई लोक पळून गेले असें पाहून ते पोट धरधरून हंसले आणि नंतर आपल्या वाटेनें चालते झाले. भोई, फुलमणी आणि दुर्लभ चक्रवर्ती यांपैकीं कुणीच मागें फिरलें नाहीं.

प्रफुल्ल डोलींत उठून बसली. तिनें आपले हात सोडवून घेऊन तोंडावरचा फडका काढून फेकून दिला. दोन प्रहर रात्रीं आरडा ओरडा करण्यांत अर्थ नाहीं, असे पाहून ती स्वस्थ राहिली. पहिल्यानें ती भीतीनें गळाठून गेली होती, पण जेव्हां तिच्या ध्यानांत आलें, की आतां धाडस केल्यावांचून गत्यंतर नाहीं, तेव्हां ती डोलींतून बाहेर आली. ते दोघे वाटसरू आले आणि गेले ते तिनें पाहिलें होतें. आपल्याला पकडून नेणारे पुन्हां येतील आणि पकडून नेतील या भीतीनें ती जंगलांत शिरली. तिथें रात्र काढायची आणि उजाडल्यावर मग काय होईल तें पाहायचें असें तिनें ठरविलें.

पहाट झाली तेव्हां तिनें जंगलांतच इकडे तिकडे फिरून पाहिलें. तिथें एक मळलेली पायवाट दिसत होती, अर्थात् तिथें मनुष्यवस्ती असेल अशी कल्पना करून ती त्या वाटेनें निघाली. घरीं परत जायला ती भीत होती. कारण कदाचित तिथून त्यांनीं तिला पुन्हां धरून नेलें असतें. त्यापेक्षां वाघलांडग्यांनीं खाल्लें तरी पत्करेल, असा विचार करून ती जंगलांत शिरली.

ती बराच रस्ता चालून गेली तरी गांव दिसलें नाहीं. पुढें मळलेली वाटही नाहींशी झाली. पुढें रस्ता नव्हता. तिथेंच एकदोन विटा पडल्या होत्या, त्यावरून तिला वाटलें कीं कुठें तरी जवळपास मनुष्यवस्ती असावी. ती पुढें जाऊं लागली तसतशा जास्त जास्त विटा पडलेल्या दिसूं लागल्या. शेवटीं त्या घनदाट जंगलांत एक भला मोठा कोसळलेला वाडा तिला दिसला. तिनें विटांच्या पुंजक्यावर चढून चौफेर नजर टाकली. त्या वाड्यांतल्या चारदोन खोल्या अजून शाबूत होत्या. आंत कुणीतरी रहात असेल, असें वाटून ती त्या खोलींत शिरली. सारीं दारें उघडीं होती पण आंत कुणीही माणूस नव्हतें. मात्र मनुष्यवस्तीच्या खुणा दिसत होत्या.

कुणीतरी कण्हतें आहे, असें कानीं आल्यामुळें ती त्या आवाजाच्या धोरणानें एका खोलींत गेली. तिथें एक म्हातारा बिछान्यावर पडून कण्हत होता. तो अस्थिपंजर झाला होता. त्याचे डोळे खोल गेले होते. त्याला श्वास लागला होता. तो मरणाच्या दाराशीं उभा असावा असें प्रफुल्लला वाटलें.

ती त्याच्याजवळ गेली तेव्हां त्यानें ओढलेल्या आवाजानें विचारलें, "कोण तूं ? माझ्या मृत्युकाळीं माझ्या सोडवणुकीसाठीं आलेली देवता आहेस का ?"

प्रफुल्ल म्हणाली, "मी एक अनाथ स्त्री आहें. रस्ता चुकून इथं आलें. तुम्हीही अनाथ दिसतां. मी काय करूं तुमच्यासाठीं ?"

म्हातारा म्हणाला " जय नंददुलाल ! माणसाचं तोंड दिसलं यावेळीं ! तहानेनं माझा प्राण जातोय. मला घोटभर पाणी दे."

त्या खोलींत पाणी भरलेली कळशी होती. प्यायला भांडें होतें, पण तें द्यायला कुणी नव्हतें. तिनें पाणी आणून दिलें तें पिऊन म्हातारा जरा सावध झाला.

सावध झाल्यावर त्यानें प्रफुल्लला जी आपली हकीकत सांगितली ती अशी :—

तो वैष्णव होता. त्याचें जवळचें कुणी नव्हतें. एक वैष्णवी होती, ती तो आजारी पडलेला पाहून त्याची असली नसलेली चीजवस्त घेऊन पळून गेली. तो वैष्णव असल्यामुळें त्याला कबर दिली पाहिजे होती. अग्नी द्यायचा नव्हता. त्याच्या सांगण्याप्रमाणें वैष्णवीनें वाड्याबाहेर खड्डा खणून ठेवला होता. कुदळ फावडें तिथेंच पडलें होतें. म्हातारा म्हणाला, 'मी मेलों कीं मला ओढून नेऊन त्या खड्डयांत टाक आणि वर माती ओढ.'

प्रफुल्लनें ती कबुली दिली तेव्हां तो म्हातारा म्हणाला, "माझं कांहीं द्रव्य इथं

पुरलेलं आहे. वैष्णवीला त्याचा पत्ता नव्हता. तें कुणाला तरी देऊन टाकल्याशिवाय माझे प्राण जायचे नाहींत. आतां तूं आली आहेस तेव्हां तें सारं द्रव्य मी तुला देतों —माझ्या या बिछान्याखालीं एक तक्ता आहे, तो उचल. आंत तळघर दिसेल पायऱ्या उतरून खालीं जा. भिऊं नकोस. जातांना दिवा घेऊन जा. खालीं मातीत एक कोपरा दिसेल. तिथें वायव्येकडे शोध कर तिथं तें द्रव्य सांपडेल—" तो जरा थांबून म्हणाला, " वाड्यांत गोठा आहे. तिथें गाई आहेत. थोडं दूध काढून आणून मला दे आणि तूंही घे. "

तिनें तसें केलें. दुपारीं म्हाताऱ्याचा प्राण गेला.

प्रफुल्लनें त्याला उचलून कबरेंत टाकलें आणि वर माती घालून तो खड्डा बंद केला. जवळच असलेल्या विहिरीवर स्नान करून ती आली आणि अंगावरचें अर्धे वस्त्र तिनें उन्हांत धरून वाळवलें.

— ९ —

म्हाताऱ्याला मूठमाती दिल्यावर प्रफुल्ल त्याच्या बिछान्याखालच्या जागीं खोदून पाहूं लागली. त्यानें सांगितल्याप्रमाणें तक्ता होता आणि तो उचलल्यावर तळघरांत उतरून जायला पायऱ्याही होत्या. खालीं उतरून गेल्यावर तिनें ठिकठिकाणीं आवाज करून पाहिलें. बराच वेळपर्यंत तिनें तपास केला, पण विशेष कांहीं हातीं लागलें नाहीं. तिनें पुन्हां एकदां सर्वत्र ठाकूनठोकून पाह्यचं ठरविलें.

यापूर्वी या म्हाताऱ्याचा इतिहास देणें अवश्य आहे. त्याचें नांव होतें कृष्णगोविंद दास! तो एका सुंदर वैष्णवीच्या मोहांत सांपडून वैष्णवदीक्षा घेऊन वृंदावनला गेला होता. तिथून तो गांवोगांव फिरत पुन्हां बंगालमध्यें आला. कुठेंतरी काम मिळण्याच्या आशेनें तो मुर्शिदाबादला आल्यावर त्याच्या त्या वैष्णवीवर नबाबाची नजर गेली. पैशाच्या लोभानें ती नबाबाला राजी होईल, असें दिसून आल्यामुळें तो तिला घेऊन पद्मा नदी ओलांडून आला. तो एखादें एकांत स्थळ शोधूं लागला. शोधतां शोधतां तो पडका वाडा असलेलें या जंगलांतलें स्थान त्याला सांपडलें. या स्थानीं मनुष्यप्राण्याचा प्रवेश होणें दुर्घट आहे असें पाहून त्यानें इथें मुक्काम केला. जरूरीच्या वस्तु आणण्यासाठीं तो स्वतः बाजाराला जात असे, पण वैष्णवीला कुठेंही बाहेर जाऊं देत नसे.

एके दिवशीं कृष्णगोविंद या वाड्यांत खणीत असतांना त्याला जुन्या काळची मोहर सांपडली. त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. त्यानें आणखी खोदून पाहिलें तेव्हां त्याला मोहरा भरलेलें एक भांडें सांपडलें. या द्रव्यावर त्याचा चरितार्थ सुखानें होऊं लागला.

अशा या जुन्या वाड्यांत कुठें ना कुठें तरी द्रव्य पुरलेलें असतें असा समज होता. कृष्णगोविंदला वाटलें, कीं यापेक्षां आणखी द्रव्य कुठेंतरी असलें पाहिजे. हा वेळपर्यंत त्यानें वैष्णवीला या भूमिगत द्रव्याचा पत्ता लागूं दिला नव्हता. अर्थात् ज्यावेळीं अधिक खोदून पहाण्याचें त्याच्या मनांत आलें त्यावेळीं त्यानें वैष्णवीला सांगितलें, " आज माझ्यानं बाजाराला जाववत नाहीं. तूंच बाजार करून ये. "

इतक्या दिवसांनीं सुट्टी मिळाल्यामुळें वैष्णवी लवकर परत येणार नाहीं, याची त्याला खात्री होती. त्यानें तळघर खोदायला सुरवात केली आणि तिथें त्याला मोहरा असलेलीं वीस भांडीं सांपडलीं.

पूर्वीच्या काळांत उत्तर बंगाल्यांत नीलध्वज वंशांतले मोठे पराक्रमी राजे राज्य करीत. त्या वंशांतला शेवटचा राजा नीलांबरदेव हा होता. त्याच्या अनेक राजधान्या होत्या आणि तिथें तितकींच राजभवनें होतीं. एकदां गौड देशचा बादशहा उत्तर बंगाल काबीज करण्याच्या उद्देशानें नीलांबरदेवावर चाल करून आला. कदाचित् पठाणांचा जय होईल आणि ते आपल्या वाडवडिलांनीं संचित केलेलें द्रव्य लुटून नेतील म्हणून त्यानें राजभांडारांतलें सर्व द्रव्य या जागीं आणून स्वहस्तें पुरून ठेवलें होतें. दुसऱ्या कुणालाच त्याचा पत्ता नव्हता. त्या युद्धांत नीलांबर बंदींत पडला आणि पठाण सेनापतीनें त्याला गौडदेशांत नेऊन ठेवलें. त्यानंतर नीलांबरदेवाचें काय झालें त्याचा कुणालाच पत्ता लागला नाहीं.

तेव्हांपासून तें सारें द्रव्य या जागीं भूमिगत राहिलें होतें. आतां ते वीस घडे कृष्णगोविंदाला सांपडले. त्यांत सोने, मोती, हिरे वगैरे अत्यंत मौल्यवान् जिन्नस भरपूर भरलेले होते. कृष्णगोविंदानें ते तसेच पुरून ठेवले. त्या वैष्णवीला त्याची दाद लागूं दिली नाहीं. तो अगदीं कंजूषपणें तें द्रव्य वापरीत होता. आतां तें सर्व द्रव्य प्रफुल्लच्या हातीं आलें होतें. तिनें तें तसेंच पुरून ठेवलें. सारा दिवस परिश्रम करावे लागल्यामुळें थकून जाऊन ती झोंपी गेली.

सकाळीं प्रफुल्ल उठली, त्यावेळीं तिला हाच प्रश्न पडला होता, आतां काय करायचें, कुठें जायचें, या निबिड जंगलांत एकटेंच कसें राह्यचें ? घरीं जायचें म्हटलें तर वाटेंत डाकूंचें भय होतें, आणि हें द्रव्य घेऊन घरीं जातां येणार होतें कसें ? दुसऱ्या कुणाला पत्ता लागला तर या द्रव्याच्या लोभानें त्यानें तिचा जीवही घेतला असता.

शेवटीं तिनें मनाचा निश्चय केला. नशिबीं असेल तसें होईल, पण यापुढें दारिद्र्याचे चटके सहन करायचे नाहींत. इथेंच राह्यचें. तें दुर्गापूर आणि हें जंगल, तिच्यालेखीं सारखींच होतीं.

तिनें तें घर साफ करायची सुरवात केली. गाईला गवतपाणी घालून ती सैंपाकाला लागायच्या उद्देशानें निघाली. पण तिथें कांहींच नव्हतें. डाळ, तांदूळ आणण्यासाठीं बाजारांत जाणें अवश्य होतें. ती आतां पूर्णपणें निर्भय झाली होती. कशीबशी वाट शोधून काढीत ती बाजारांत जायला निघाली.

त्या घनदाट जंगलांत तिला एक ब्राह्मण भेटला. तो गोरापान होता. तेजस्वी होता आणि वयानें प्रौढ होता. तिला पहातांच ब्राह्मणानें विचारलें, " कुठं चालली आहेस मुली ? "

प्रफुल्ल म्हणाली, " मला बाजाराला जायचं आहे, पण रस्ता मला माहीत नाहीं. मीं नव्यानंच इथ आलें आहें. "

" या जंगलांत कुणी स्वेच्छेनं येत नाहीं. तूं कां आलीस ? " ब्राह्मण म्हणाला,

त्या प्रश्नाचें उत्तर न देतां प्रफुल्ल म्हणाली, " मला बाजारचा रस्ता दाखवा. "

तो म्हणाला, " बाजारचा रस्ता फार दूर आहे. एक वेळ लागेल. एकटं जाणं धोक्याचं आहे. चोर डाकूंची भीति आहे. तुझं आणखी कोण आहे ? "

" दुसरं कुणीही नाहीं. " प्रफुल्ल म्हणाली.

हें भाषण चाललेलें असतांना तो ब्राह्मण तिला नीट निरखून पहात होता. तिच्या ठायीं सर्व प्रकारचीं सुलक्षणें आहेत, असें त्याला दिसून आलें. तो तिला म्हणाला, " बाजारांत जायचा विचार सोड. वेळही लागेल आणि भीतीही आहे. इथं माझं एक दुकान आहे, तिथं तुला डाळतांदूळ मिळतील. "

" मग फारच उत्तम ! " प्रफुल्ल म्हणाली, " पण तुमचं दुकान कसं ? तुम्ही तर ब्राह्मण दिसतां ! "

" ब्राह्मणसुद्धां अनेक प्रकारचे असतात ! " तो म्हणाला, " तूं चल माझ्याबरोबर. "

तो तिला घेऊन त्या घनदाट जंगलांत शिरला त्यावेळीं ती थोडीशी घाबरली पण या जंगलांत सर्वत्रच भीति वाटण्याजोगी परिस्थिति होती. अर्थात् ती बिनधोक त्याच्याबरोबर निघाली.

तीं दोघेंही एका छोट्या घरापाशीं आली. त्या घराला कुलुप लावलेलें होतें. ब्राह्मणानें तें उघडलें आणि आंत प्रवेश केला तेव्हां प्रफुल्लला दिसून आलें, कीं तें दुकान नव्हतें. तरीही त्यांत जेवणाला अवश्य असणारे सर्व जिन्नस भरून ठेवलेले होते.

ब्राह्मण तिला म्हणाला, " तुला एकट्याला वाहून नेतां येईल तेवढं सामान घेऊन जा. "

प्रफुल्लनें ते जिन्नस घेतले आणि विचारलें, " याचे पैसे किती ? "

ब्राह्मण म्हणाला, " एक आणा. "

प्रफुल्ल म्हणाली, " माझ्यापाशी पैसा नाहीं. एक मोहोर आहे. "

तिनें ती मोहर काढून त्याला दाखवली तेव्हां ब्राह्मण म्हणाला, " ही मोहर मोडून देण्याइतका पैसा माझ्यापाशीं नाहीं. चल मी तुझ्याबरोबर तुझ्या घरीं येतों. तिथं मला एक आणा दे. "

" माझ्या घरींही पैसा नाहीं. "

" तर काय साऱ्या मोहराच आहेत ? बरं, बरं—चल तुझं घर पाहून ठेवतों. जेव्हां तुझ्या हातीं पैसा येईल तेव्हां तो मला दे. मी येऊन घेऊन जाईन. "

'तर काय साऱ्याच मोहरा ! ' हे त्याचे शब्द प्रफुल्लच्या कानाला जाणवले. या पैशाच्या लोभानें ब्राह्मण आपलें घर पाहूला मागतो आहे, असें वाटून ती म्हणाली, "मला बाजारांतच गेलं पाहिजे. मला कापडचोपडही घ्यायचं आहे."

ब्राह्मण हंसला आणि म्हणाला, " मुली, तुझा उद्देश मीं समजलों. मीं तुझ्या मोहरा चोरण्यासाठीं तुझ्या घराचा पत्ता काढतों आहें असं तुला वाटलं ! बाजारांत गेल्यावर मला चकवतां येईल असं तुला वाटलं असेल, पण मीं वाट दाखवल्याशिवाय तूं जाणार कशी अन् कुठं ?—"

प्रफुल्ल थरथर कापूं लागली असें पाहून ब्राह्मण म्हणाला, " मुली, मीं तुझ्याशीं प्रतारणा करणार नाहीं. मला ब्राह्मण समज कीं कुणीही समज, मीं डाकूंचा सरदार आहें. माझें नांव भवानी पाठक. "

प्रफुल्ल सुन्न झाली. तिनें दुर्गापुरांत भवानी पाठकचें नांव ऐकलें होतें. तो प्रख्यात डाकू होता. त्याच्या भीतीनें सारी वरेंद्रभूमि थरथर कांपत होती.

प्रफुल्लची बोबडी वळली आहे, असें पाहून भवानी म्हणाला, " तुला खरं वाटत नसेल; तर आतां प्रत्यक्ष पहा. " असें म्हणून त्यानें आंतला एक नगारा बाहेर आणला आणि त्याच्यावर काठी मारली. थोड्याच वेळांत पन्नास साठ काळपुरुषासारखे जवान हातीं लाठ्या घेऊन तिथें हजर झाले. त्यांना भवानी म्हणाला, " या मुलीला तुम्ही ओळखून ठेवा. हिला मी ' मा ' म्हटलं आहे. तुम्ही साऱ्यांनीं हिला ' मा ' म्हणूनच मानलं पाहिजे. तुम्ही हिला कोणत्याही प्रकारें त्रास द्यायचा नाहीं कीं दुसऱ्या कुणालाही हिला त्रास देऊं द्यायचा नाहीं. आतां तुम्ही जा. "

पहातां पहातां ते सारे लोक दृष्टीआड झाले. तें पाहून प्रफुल्ल थक्क झाली. ती मोठी विचारी होती. आतां यांचाच आसरा घेतल्याखेरीज दुसरा उपाय नाहीं असें पाहून ती म्हणाली, " चला मी तुम्हांला माझं घर दाखवतें. '

जेवणाचें सामान घेऊन ती भवानी पाठकच्या मागोमाग निघाली ती त्या पडक्या वाड्यांत आली. सामानाचा बोजा खालीं ठेवून तिनें एक फाटकें कुशासन तिथें होतें तें आंथरलें आणि भवानी पाठकला तिथें बसवून घेतलें.

## —१०—

भवानी पाठकनें विचारलें, " या पडक्या वाड्यांतच का तुला मोहरा सांपडल्या ? कितीशा आहेत त्या ? खरं सांग. लपवाछपवी केलीस तर माझीं माणसं येऊन हा सारा वाडा खणून काढतील. "

द्रव्याचे वीस घडे आहेत असें प्रफुल्लनें सांगितलें तेव्हां भवानी पाठक म्हणाला, " या द्रव्याचं तूं काय करणार ? घरीं घेऊन जाणार ? घरीं घेऊन गेलीस तर तूं तें राखशील कसं ? "

" आपण मदत केली तर राखीन ! "

" या साऱ्या जंगलावर माझा अधिकार आहे. या जंगलाच्या बाहेर कुणाचं रक्षण करायची जिम्मा मी घेणार नाहीं."

प्रफुल्ल म्हणाली, " तर मग तें इथंच राहूं दे. तुम्हीच तें सांभाळा. "

" हें एवढं द्रव्य घेऊन तूं काय करणार आहेस ? "

" इतर चार लोक करतात तेंच. ऐश्वर्याचा उपभोग ! "

तिचें उत्तर ऐकून भवानी ठाकूर मोठमोठ्यानें हंसला. तें पाहून प्रफुल्ल ओशाळली.

भवानी म्हणाला, " तूं अगदींच वेड्यासारखी बोललीस म्हणून मी हंसलों. तूं म्हणतेस तुझं कुणीच नाहीं. मग कुणाला घेऊन तूं या ऐश्वर्याचा उपभोग घेणार आहेस ? "

तिनें मान खालीं घातली तेव्हां तो म्हणाला, " ऐक. ऐश्वर्य मिळालं कीं कुणी त्याचा उपभोग घेऊन पुण्यसंचय करतात तर कुणी नरकाचा मार्ग मोकळा करतात. तूं काय करणार ? पुण्यसंचय करणार कीं नरकांत जाणार ? "

प्रफुल्ल मोठी साहसी होती. ती म्हणाली, " हें तुमचं भाषण डाकूंच्या सरदारासारखं दिसत नाहीं. "

" खरोखरच नाहीं. " भवानी म्हणाला, " तुझ्या लेखीं मीं डाकू नाहीं. मी तुला 'मा' म्हटलं आहे. आतां तुला सांगेन ती तुझ्या कल्याणाचीच गोष्ट आहे ! आतां सांग, तूं कोणत्या मार्गानें जाणार ? पापाच्या कीं पुण्याच्या ? "

प्रफुल्ल म्हणाली, " मी पापाच्या म्हटलं तर ! "

" तर मग मीं तुझ्याबरोबर माझे लोक देऊन हें तुझं द्रव्य तुझ्याबरोबर देऊन तुला जंगलाबाहेर घालवून देईन. तुझ्या त्या द्रव्याच्या लोभानं तुझ्याबरोबर पापाचरण करायला तयार होतील अशीं माणसं माझ्या अनुचरांत अनेक आहेत. तुझी तशीच बुद्धि होत असेल तर या क्षणाला तुला मी इथून बाहेर काढीन. हें जंगल माझं आहे. "

" तुम्हीं जर माझं हें द्रव्य माझ्याबरोबर देणार आहांत, तर मग यांत माझं नुकसान कसलं ? "

" तें राखतां येईल का तुला ? " त्यानें विचारलें, " तुझ्यापाशीं रूप आहे, यौवन आहे, डाकूंच्या हातून सुटलीस तरी रूपयौवनाच्या धोक्यांतून तूं सुटणार नाहीस. पापाची लालसा संपेपर्यंत तुझं द्रव्यही संपून जाईल. द्रव्य

संपायला वेळ लागत नाहीं—मग तूं काय करशील ? नरकाच्या मार्गावर जाशील ? लालसा आहे, पण लालसेच्या तृप्तीचा उपाय नाहीं असं झालं, कीं नरकाचा मार्ग मोकळा होतो. सांग, तूं काय करणार ? "

" मीं गृहस्थाघरची मुलगी, मला पाप माहीत नाहीं बाबा. मीं कशाला पापाच्या मार्गानं जाऊं ? मीं जन्मदरिद्री आहें—मला संपत्ति नको आहे. पोटापुरतं मिळालं कीं झालं. हें सारं द्रव्य तुम्ही घ्या आणि मला रोज घांसभर अन्न मिळेल अशी तजवीज करा. "

तिचें तें उत्तर ऐकून भवानी पाठकला समाधान वाटलें. तो म्हणाला, " मीं हें द्रव्य घेणार नाहीं. तें तुझं आहे—"

प्रफुल्लला आश्चर्य वाटलें, असें पाहून तो म्हणाला, " हा डाकू—दुसऱ्यावर दरोडे घालतो अन् आतां हें असं ढोंग कां करतो असं तुला वाटत असेल, पण त्याचं निराकरण मीं आतां करीत नाहीं. तूं पापाचरणाला प्रवृत्त झाली असतीस तर तुझं हें द्रव्य मीं लुटलंही असतं. आतां मात्र हें मला नको आहे. तुला पुन्हां विचारतों, हें द्रव्य घेऊन तूं काय करणार ? "

प्रफुल्ल म्हणाली, " आपण ज्ञानी आहां. मीं या धनाचा-या द्रव्याचा कसा विनियोग करायचा तें तुम्हीच मला सांगा. "

" तें तुला शिकवायला पांचसात वर्षं लागतील. " भवानी म्हणाला, " तुझी तयारी असली तर मीं तुला शिकवीन. या पांचसात वर्षांत तूं या द्रव्याला स्पर्श करायचा नाहीं. तुझ्या भरणपोषणाची व्यवस्था मी करीन. पण मीं जें कांहीं सांगेन तें तूं बिनतक्रार ऐकलं पाहिजेस—आहे कबूल ? "

" यावेळीं मीं कुठं राह्यचं ? "

" इथंच—इथंच राह्यचं. या जागेची मीं तात्पुरती दुरुस्ती करून देईन. "

" मी एकटीच राहूं का इथं ? "

" नाहीं. मीं तुझ्या सोबतीला दोन बायका पाठवून देईन. त्या सदोदित तुझ्यापाशीं राहातील. तूं मुळींच भिऊं नकोस. या जंगलचा राजा मीं आहें. मी उभा आहें तोंवर तुझा सर्व प्रकारें प्रतिपाळ करीन.—तुला कोणताही धोका येणार नाहीं. बरं, तुला लिहितां वाचतां येतं का ? नाहीं ! मग आधीं तुला लिहायला वाचायला शिकवलं पाहिजे. "

प्रफुल्लनें कबुली दिली. त्या निर्जन अरण्यांत आपल्याला कुणाचें तरी छत्र लाभलें हें पाहून ती आल्हादित झाली.

तिचा निरोप घेऊन भवानी ठाकूर बाहेर आला त्यावेळीं एक व्यक्ति त्याची वाट पहात होती. तो शरिरानें बलिष्ठ असून उंचापुरा होता. त्याला पहातांच भवानीनें विचारलें ! " तूं इथं कुठं रंगराज ? "

" तुम्हांलाच शोधायला, " रंगराज म्हणाला, " तुम्ही इथं कुठं ! "

" इतके दिवस ज्या शोधांत होतों त्याचं सार्थक झालं. आज ती व्यक्ति मिळाली. "

" कोण ? राजा ? " रंगराजनें विचारलें.

" नाहीं—राणी. "

" आतां राजाराणी शोधायची जरूरी नाहीं. आतां इंग्रज राजा झाला आहे. कलकत्त्याला म्हणे हष्टिन नांवाच्या कुणी इंग्रजानं चांगलं राज्य थाटलंय्. "

" मी तसला राजा शोधीत नव्हतों. मी जें शोधीत होतों, तें तुला माहीतच आहे. "

" तें मिळालं का आतां ? "

" तें मिळायचं नसतं. तयार करायचं असतं. देवानं लोखंड निर्माण केलं आहे. माणूस त्याचं हत्यार घडवतो. तसं उत्तम पोलाद मिळालं आहे. पांच-सात वर्षांत ठाकून ठोकून घडवलं तर तिखट धारेची तरवार तयार होईल. असं पहा, या घराच्या आजूबाजूला माझ्याखेरीज दुसऱ्या कुणाही पुरुषानं येतां कामा नये. ती तरुण आहे, तशीच सुंदर आहे. "

" जशी आज्ञा. " रंगराज म्हणाला, " सध्यां इजारदार लोकांनीं रंजनपूर लुटलंय्. म्हणून मीं तुम्हांला शोधीत होतों. "

" चल तर. " भवानी पाठक म्हणाला, " इजारदारांचं कोठार लुटून गांवच्या लोकांचं धन त्यांचं त्यांना देऊन टाकूं. गांवच्या लोकांचा पाठिंबा आहे ना ? "

" असावा असं वाटतं. "

रंगराजला घेऊन भवानी पाठक निघून गेला. कबूल केल्याप्रमाणें त्यानें प्रफुल्लच्या सोबतीसाठीं दोन बायका पाठवून दिल्या. त्या दोघी दोन प्रकारच्या

होत्या. बाजार करण्यासाठीं जिला नेमली होती ती गोब्राची आई ऱ्याहत्तर वर्षांची म्हातारी होती. ती बहिरी होती. तिला केव्हां केव्हां ऐकूं येई आणि केव्हां केव्हां येत नसे.

दुसरी जी प्रफुल्लला सोबत करण्यासाठीं दिली होती, ती पूर्णपणें वेगळ्या वृत्तींची होती. वयानें ती प्रफुल्लपेक्षां पांचसात वर्षांनीं वडील होती. ती वर्णानें काळी असली तरी रूपानें सुंदर होती.

गोब्राच्या आईला कांहीं विचारून घेणें प्रफुल्लला कठीण गेलें. बाजारहाट करण्यापेक्षां दुसरें कोणतेंही काम तिच्याकडून होणार नव्हतें असें तिला दिसून आलें. प्रफुल्लनें त्या दुसरीला विचारलें, त्यावेळीं ती ब्राह्मणी असल्याचें तिला कळून आलें. तरीपण तिचें लग्न झालें नव्हतें. लहानपणींच मुलें चोरणाऱ्या टोळीनें तिला चोरून नेऊन एका राजाला विकलें होतें. राजपुत्राशीं तिचा संबंध आला होता पण तो थोडेच दिवस. तिथून ती पळून आली होती— राणीनें दिलेल्या दागिन्यासकट पळून आली होती. वाटेंत ती डाकूंच्या हातीं सांपडली. तिची हकीकत कळली तेव्हां भवानी ठाकूर यांनीं तिचे दागिने काढून तर घेतले नाहीतच, पण तिला आणखी कांहीं दागिने दिले. आपल्या घरीं त्यांनीं तिला आश्रय दिला. ती त्यांना पिता म्हणून मानीत होती.

ती म्हणाली, " त्यांनीं एकप्रकारें माझं कन्यादानच केलंय. रूप, यौवन प्राण सर्वस्वीं श्रीकृष्णाला वाहिले आहेत--अर्थात् तोच माझा पति. श्रीकृष्णाच्या ठायीं एकदां मन गेलं कीं मग तें दुसरीकडे जात नाहीं "

प्रफुल्ल म्हणाली, " तूं काय म्हणतेस तें मला नीटसं कळत नाहीं. तें राहूं दे -तुझं नांव काय तें आधीं सांग ना. "

ती म्हणाली, " भवानी ठाकूरनीं माझं नांव ठेवलंय् निशी. दिवसाची बहीण निशी. "

त्या दोघी आल्यामुळें प्रफुल्लचा संसार एकप्रकारें थाटला गेला.

## — ११ —

ज्या रात्रीं दुर्लभ चक्रवर्तीनें प्रफुल्लला तिच्या घरांतून पळवून नेलें त्याच रात्रीं व्रजेश्वर दुर्गापूरला प्रफुल्लच्या घरीं आला होता. तो घोड्यावर बसून आला होता. तिथें येऊन पहातों तो तें घर रिकामें होतें. तिचा पत्ता द्यायला

जवळपास कुणीच नव्हतें. व्रजेश्वरला वाटलें, कीं त्या घरांत एकटी राहाणें अशक्य झाल्यामुळें प्रफुल्ल कोणातरी नातेवाईकाच्या घरीं गेली असावी. तो चोरून आलेला असल्यामुळें अधिक वेळ थांबणें त्याला शक्य नव्हतें. अर्थात् तो रातोरात परत आपल्या घरीं गेला.

असेच कांहीं दिवस गेले. हरवल्लभचा संसार पूर्वीसारखाच चालला होता. पण व्रजेश्वराच्या वृत्तींत दिवसें दिवस बदल होत होत होता. पहिल्यानें तें त्याच्या आईच्या ध्यानीं आलें. त्याला जेवण नीटसें जात नव्हतें. सैंपाकाला नांवें ठेवून रोजच्या जेवणावरून तो उठून जात असे. त्याला मंदाग्नि झाला असेल अशी कल्पना करून त्याची आई त्याला आलें, लिंबू, सैंधवाचें चाटण करून देई, तरीही त्याला गुण पडेना. पुढें वैद्यबुवांना बोलवायचा प्रश्न निघाला, पण व्रजेश्वरनें ती गोष्ट थट्टेवारी उडवून लावली.

ब्रह्मआत्याबाईनें त्याच्या मनाचा अंदाज घ्यायचा प्रयत्न केला पण तो थांग लागूं देईना. ब्रह्म म्हणाली, "अरे तूं जेवीत कां नाहींस नीटसा? सागरला बोलवूं का तुझा सैंपाक करण्यासाठीं?"

"छान!" व्रजेश्वर म्हणाला, "तुला अनुभव आहे का तिच्या सैंपाकचा? अशी एवढी माझ्या जिवावर उदार कां झालीस आत्या?"

"मग आतां काय करायचं?" ब्रह्म म्हणाली, "नयनचा सैपाक तुला नजरेसमोर नको, सागरला मुळीं सैंपाकच करतां येत नाहीं, तर काय प्रफुल्लला बोलावून आणूं?"

व्रजेश्वरचा चेहरा एकदम उजळला. तरीपण तो म्हणाला, "ती म्हारीण ना?"

"कोण म्हणतो ती म्हारीण म्हणून?" ब्रह्म म्हणाली, "साफ खोटं आहे तें. तुझा बाप उगीच भीतो गांवच्या चार लोकांना. पोटच्या गोळ्यापेक्षां कांहीं गावगंगा मोठी नव्हे. पुन्हां काढूं का ती गोष्ट?"

व्रजेश्वर म्हणाला, "नको. माझ्यापायीं माझ्या बापाचा चारचौघांत अपमान व्हावा, हें मला नाहीं सहन व्हायचं."

त्या दिवशीं यापेक्षां अधिक कांहीं बोलणें झालें नाहीं.

तें प्रकरण मोठें बिकट होतें. प्रफुल्ल दिसायला सुन्दर होती त्याचप्रमाणें अंतरांत देखील तितकीच सुंदर, अधिकच मधुर असल्याचा त्या रात्रीं त्याला पुरावा सांपडला होता. ती त्याची लग्नाची बायको—हक्काची असूनसुद्धां

दुरावली होती, हीच गोष्ट त्याला जाणवत होती. त्या घरच्या सुनेला अधिकारापासून वंचित करून, अपमान करून, खोटे आरोप करून कायमची बहिष्कृत केली, अन्नाला मोताद करून ठेवली, हें पाहून व्रजेश्वरला अत्यंत दुःख होत होतें. व्रजेश्वरचें हृदय प्रफुल्लमय झालें होतें. तिथें दुसऱ्या कुणालाही जागा राहिली नव्हती. त्या म्हातारीला हें उमगलें नाहीं.

स्वतःचें दुष्कृत्य लपविण्यासाठीं फुलमणी न्हाविणीनें एक अजब बातमी पसरून ठेवली होती. ती सांगे, कीं त्या दिवशीं रात्रीं तिसऱ्या प्रहरच्या सुमारास ती जागी होऊन पाहाते तर प्रफुल्लची मरून गेलेली आई तिला प्रफुल्लच्या बिछान्याशेजारीं दिसली. लगेच त्या खोलींत वावटळ उठली. कांहींच दिसेनासं झालं. फुलमणी मूर्छित होऊन पडली. तिची दांतखीळ बसली. उजाडायच्या सुमाराला ती शुद्धीवर येऊन पहाते, तो प्रफुल्ल तिथं नव्हती. तिची आई तिला सदेह उचलून घेऊन गेली असावी, असें ती सर्वांना सांगत फिरत असे.

ही फुलमणीची दंतकथा व्रजेश्वराच्या गांवीं येऊन पोहोचेपर्यंत त्यांत बरेचसे बदल झाले होते. प्रफुल्ल त्रिदोष होऊन मेली आणि मरायच्यापूर्वी तिच्या आईनं तिला दर्शन दिलें होतें—किंबहुना त्याच धक्यानें ती मेली असावी, अशी बातमी व्रजेश्वरच्या कानापर्यंत येऊन पोहोंचली.

ती बातमी ऐकल्यामुळें हरवल्लभबाबूंनीं स्नान करून अशौच सोडलें पण श्राद्ध केलें नाहीं.

नयनतारेनंही स्नान केलें. त्यावेळीं ती म्हणाली, "एक पाप गेलं. आतां राहिलेल्या दुसरीसाठीं एकदां स्नान केलं कीं सुटलें."

असेच कांहीं दिवस गेले. व्रजेश्वर दिवसेंदिवस थकत चालला होता. त्यानें बिछाना धरला. थोडा थोडा ताप येत होता, पण तो अगदींच निर्जीव झाला होता. औषधोपचाराचा कांहीं उपयोग होईना.

खरी गोष्ट फार दिवस गुप्त राहिली नाहीं. पहिल्यानें ती म्हातारीच्या नजरेला आली. त्यानंतर व्रजेश्वरच्या आईच्या—बायकांनाच या गोष्टी सर्वांच्या आधीं कळतात. शेवटीं घरमालकांच्या कानीं ही गोष्ट गेली तेव्हां त्यांना मोठा धक्का बसला. ते म्हणाले, "काय केलं मी हें? माझ्या पायावर मीच कुऱ्हाड मारून घेतली." गृहिणी म्हणाली, "मुलगा बचावला नाहीं तर मी विष खाईन!" हरवल्लभनें प्रतिज्ञा केली, "देवदयेनं आतां व्रजेश्वर बचावला तर मी त्याच्या मनाविरुद्ध कोणतीही गोष्ट करणार नाहीं."

हळूहळू व्रजेश्वरची प्रकृति सुधारूं लागली. कांहीं दिवसांत तो बिछाना सोडून बाहेर हिंडूं फिरूं लागला. प्रफुल्लसाठीं अजूनही त्यांचें मन आचके देत होतें. प्रफुल्लच्या मृत्यूला आपला बापच कारणीभूत झाला असें जरी त्याला वाटत होतें तरीही बापावरची त्याची भक्ति अचल राहिली होती.

## — १२ —

प्रफुल्लच्या शिक्षणाला सुरवात झाली. निशी पहिल्यानें राजाच्या घरीं असतांना लिहिणें वाचणें शिकली होती. नंतर भवानी ठाकूरपाशीं आल्यावर तिनें आपलें ज्ञान वाढवलें होतें. प्रफुल्लला शिक्षणाचे पहिले धडे तिनें दिले. त्यानंतर भवानी ठाकूरनीं स्वतः अध्यापकाचें आसन ग्रहण केलें.

प्रफुल्लला शिकवीत असतांना तिची तीव्र बुद्धि आणि ग्रहणशक्ति पाहून भवानीला आश्चर्य वाटलें. व्याकरणापासून आरंभ करून रघु, कुमारसंभव, नैषधप्रभृति काव्यापासून भगवद्गीतेपर्यंत त्यानें तिला शिकवलें. पांच वर्षांत हें शिक्षण पूर्ण झालें.

या शिक्षणाखेरीज प्रफुल्लला इतर शिक्षणही दिलें जात होतें. गोब्राची आई आणि निशी या होत्या, तरीही घरचें सर्व काम प्रफुल्ललाच करावें लागे. लहानपणापासून आईच्या हातापाशीं काम करीत असल्यामुळें तिला तें कठिण गेलें नाहीं.

ठाकूरानीं तिला भोजनाचेही नियम लागू केले होते. ते सर्व ती नियमानें पाळी. मात्र एका बाबतींत ती आपल्या गुरूलाही दाद देत नसे. एकादशीच्या दिवशीं वाटेल तिथून शोधून काढून ती मासे खात असे.*

प्रत्येक वर्षी भवानी ठाकूर तिच्या खाद्य पदार्थांत बदल करीत असे आणि तो एक वर्षपर्यंत तिला चालूं ठेवावा लागे. पांचव्या वर्षी मात्र तिला यथेच्छ भोजन करण्याची मोकळीक देण्यांत आली.

---

* बंगाल देशांत अशी चाल आहे कीं विधवेनें एकादशीचा उपास करायचा. मासे मुळीच खायचे नाहींत. एवढ्यासाठीं बंगालच्या सवाष्ण बायका एकादशीदिवशीं हटकून मासे खातात. कारण तें सवाष्णपणाचें लक्षण समजलें जातें.

रोजच्या रहाणींतही तिला असेच नियम लावून देण्यांत आले होते. त्या नियमाच्या पायीं तिला देहदंड सोसावा लागे, पण दिवसेंदिवस तिच्या अंगीं काटकपणा येऊं लागला होता. पाणी, वारा, ऊन आणि आगीची झळ हीं सारीं सोसण्याची तिला संवय लावण्यांत आली होती.

पुढें त्यांनी तिला मल्लयुद्ध करण्याची आज्ञा दिली. याकामीं पहिल्यानें तिला संकोच वाटत होता. सुरवातीला निशीबरोबर ती कुस्ती खेळत असे. निशी लहानपणीं डाकूंच्या मेळाव्यांत वाढलेली असल्यामुळेंच भवानी ठाकूरनीं तिला प्रफुल्लच्या दिमतीस दिलें होतें.

भवानी म्हणे, "दुर्बल शरीरानें इंद्रियजय होऊं शकत नाहीं. त्यासाठीं व्यायाम पाहिजे."

पहिल्या पहिल्यानें तिला पुरुषाशीं भाषण करण्याचा सुद्धां निषेध केला होता. क्रमाक्रमानें हें बंधन ढिलें करण्यांत आलें. दलांतले सारे पुरुष तिला 'मां' म्हणत आणि तीही त्यांना पुत्रवत् मानी.

अशाप्रकारें वेगवेगळ्या रितीनें तिची कसोटी पाहून आणि तिला शिक्षण देऊन भवानी ठाकूरनें अतुल ऐश्वर्याचा उपभोग घ्यायला तिच्या ठायीं पात्रता आणली. पांच वर्षांनीं तिचें शिक्षण पुरें झालें.

फक्त दोन बाबतींत प्रफुल्लनें भवानी ठाकूरची अवज्ञा केली होती. ती एकादशीच्या दिवशीं हट्टानें मासे खात असे आणि कितीही विचारलें तरी आपला इतिहास सांगत नसे.

सर्व दृष्टीनें प्रफुल्लला बलवती बनविल्यावर एके दिवशीं भवानी ठाकूरनें तिला विचारलें, "या संपत्तीचा तूं विनियोग कसा करणार आहेस?"

प्रफुल्ल म्हणाली, "मी सारं कांहीं कृष्णार्पण केलं आहे, त्याबरोबरच ही संपत्तीही कृष्णार्पण झाली आहे."

भवानीनें विचारलें, "ही तुझी संपत्ती श्रीकृष्णाच्या पादपद्मीं पोचणार कशी?"

प्रफुल्ल म्हणाली, "सर्वभूतांच्या ठायीं त्याचा वास आहे—अतएव ही सर्व संपत्ति सर्व भूतांच्या उपयोगाला लावणार आहें."

"हे सर्वभूतांना दान करणं मोठं कष्टाचं काम आहे. तें तुझ्यानं होईल?"

"इतके दिवसांत मी काय शिकलें तर?"

" मी त्या कष्टाबद्दल म्हणत नाहीं. केव्हां केव्हां थोडीशी दुकानदारी करावी लागते. थोडासा पोशाखाचा दिखाऊपणा—थोडासा बाह्य देखाव्याचा थाट करावा लागतो. तें करणं कठिण जाईल. पण तें झेपेल तुला ?"

" म्हणजे कसं काय ?" प्रफुल्लनें विचारलें.

" ऐक." भवानी म्हणाला, " मी डाकूगिरी करतों तें, तुला सांगितलंच आहे—"

" कशाला करतां ?" प्रफुल्ल म्हणाली, " माझ्यापाशीं ही श्रीकृष्णाची संपत्ति आहे ती ताब्यांत घ्या आणि हें दुष्कर्म सोडून द्या."

भवानी म्हणाला, " मला संपत्तीची जरुरी नाहीं. माझ्यापाशीं भरपूर पैसा आहे. मी डाकूगिरी करतों ती पैशासाठीं नव्हे—राजत्त्वासाठीं !"

" डाकूगिरीचा आणि राजत्त्वाचा काय संबंध ?" प्रफुल्ल म्हणाली.

" ऐक सांगतों." भवानी म्हणाला, " या देशांत आज राजा नाहीं. मुसलमान स्वतंत्र झाला आहे. इंग्रज सध्यां घुसताहेत, पण त्यांना राज्य चालवायचं कळत नाहीं अन् ते चालवीतही नाहींत. मला दुष्टांचं दमन आणि शिष्टांचं पालन करायचं आहे—"

" दरोडे घालून ?" प्रफुल्लनें विचारलें.

" नीट ऐक. तुला समजावून सांगतों." असें म्हणून त्यानें ओजस्वी भाषेंत तिच्या पुढें देशाच्या दुरवस्थेचें वर्णन केलें. जमीदार लोक कसे दुरात्मे आहेत, त्यांचे कर्मचारी बाकीदारांचीं घरेदारें लुटून कसे त्यांना नागवतात, गरीबगुरीबांचीं घरें कशीं काबीज करतात, ते तोंड द्यायला तयार झाले तर त्यांचीं घरेंही जाळतात आणि जीवही घेतात, स्त्रियांची बदनामी करतात, भरचौकांत त्यांना विवस्त्र करून मार देतात, त्यांच्या पातिव्रत्याचा भंग करतात आणि त्यांना विरूपही करतात. त्याकाळच्या सर्व अत्याचारी लोकांच्या भयंकर दौरात्म्याचें वर्णन करून भवानी ठाकूर म्हणाला, " या साऱ्या दुरात्म्यांना मला शिक्षा करायची आहे आणि अनाथ दुर्बलांचं रक्षण करायचं आहे. मी हें कसं करतों तें कांहीं दिवस माझ्या बरोबर राहून पहा. मी तुला सांगितलंच, कीं या कामीं थोडीशी दुकानदारी हवी. माझ्याबरोबर जायचं म्हणजे थोड्याशा थाटांतच गेलं पाहिजे. या संन्यासी वेषांत जाऊन चालायचं नाहीं."

प्रफुल्ल म्हणाली, " मी सारं कर्म कृष्णार्पण केलं आहे. कर्म त्याचं—माझं नव्हे. त्या कर्मासाठीं जें जें कांहीं करणं अवश्य असेल तें तें मी करीन." भवानी ठाकूरची फार दिवसांची इच्छा पूर्ण झाली. तो स्वारीवर निघाला. भरलेल्या धनाचा घडा बरोबर घेऊन प्रफुल्ल आणि निशी या दोघीही त्याच्या-बरोबर निघाल्या.

भवानी ठाकूरचा उद्देश कोणताही असो, त्याला एका तिखट अस्त्राची जरूरी होती. गेलीं पांच वर्षं त्यानें तावून सुलाखून प्रफुल्लसारखी समशेर धारदार बनवली होती. शिवाय धनाची धार म्हणजे मोठी धार—त्याचीही जोड मिळाली होती.

भवानी ठाकूरनें एका गोष्टीकडे दुर्लक्ष केलें.—प्रफुल्ल एकादशीच्या दिवशीं हट्टानें मासे खाते, या गोष्टीच्या मुळाशीं जायला तो विसरला. तीच त्याची चूक झाली.

गेलीं पांच वर्षं प्रफुल्लला बैठें शिक्षण देण्यांत आलें होतें. पुढलीं पांच वर्षं तिनें प्रत्यक्ष कामाला लागून लोकसेवेचे धडे घेण्यांत घालवलीं.



# द्वितीय खंड

## १

ज्या दिवशीं प्रफुल्लला महाराची पोर ठरवून हरवल्लभबाबूनें घरांतून घालवून दिलें होतें त्या दिवसापासून आतां दहा वर्षें होऊन गेलीं होतीं. या दहा वर्षांत हरवल्लभ रायची परिस्थिती बिघडत चालली होती. ते अराजकाचे दिवस होते. इकडे इजारादार देवीसिंहाचे अत्याचार, तर तिकडे डाकूंचे अत्याचार सुरू होते.

एकदां हरवल्लभ रायचा खजिना तालुक्यांतून येत असतांना तो डाकूंनीं लुटला. त्यावेळीं देवीसिंहाचा करभार देणें त्याला शक्य झालें नाहीं म्हणून देवीसिंहानें त्याचा एक तालुका विकून टाकला. ही देवीसिंहाची विक्रीची पद्धत मोठी अजब होती. हेस्टिंग्ज साहेब आणि गंगागोविंदसिंह यांच्या कृपेनें सारे सहकारी अधिकारी देवीसिंहाच्या मुठींत होते. खरेदी विक्रीचे जे आडाखे तो ठरवी ते तो अंमलांत आणी. हरवल्लभरायच्या दहा हजार रुपये किंमतीच्या गांवाची विक्री त्यानें अडीचशें रुपयाला केली आणि ती आपल्या नांवें करून घेतली–अर्थात् देवीसिंहाचें देणें अपुरें राहिलें.

देवीसिंहानें तगादा लावल्यामुळें हरवल्लभ राय घाबरून गेला. तो आपल्याला कैद करील या भीतीनें त्यानें आपल्या मुलुखांतला कांहीं भाग गहाण ठेवून देवीसिंहाचें ऋण फेडून टाकलें. अशा रितीनें मूळ इस्टेटींतच घट आल्यामुळें त्याचें उत्पन्न कमी झालें, पण खर्च कांहीं घटला नाहीं. आजपर्यंतचा लौकिक शाबूत ठेवण्याच्या पायीं तो जेरीस येत होता. दोलदुर्गोत्सव, इतर सणवार क्रियाकर्म वगैरेसाठीं होणारा खर्च चालू होता. डाकूंच्या भीतीनें लाठीवाल्यांची बी भरती करावी लागली होती, तोही एक खर्च वाढला होता.

अशा रितीनें आय कमी आणि व्यय जास्त झाल्यामुळें तो कर्जबाजारी झाला. देण्यावर देणें वाढलें. होतें नव्हतें तें सर्व गेलें आणि थोड्याच काळांत त्याला कर्जही मिळेनासें झालें.

इकडे देवीसिंहाचें देणें पांच हजारावर गेलें होतें. हरवल्लभला तें देणें अशक्य झालें होतें. शेवटीं त्याला गिरफदार करण्याचा परवाना निघाला. त्यावेळीं इंग्रजाचे कायदे सुरू झालेले नसल्यामुळें असे परवाने काढण्यासाठीं कायद्याचा आधार घ्यावा लागत नसे. सारे व्यवहार बेकायदा चालले होते.

बापावर हा प्रसंग आल्यामुळें व्रजेश्वरला कांहींतरी हालचाल करणें भाग आलें.

व्रजेश्वरच्या सासुरवाडीला मोठी धामधूम उडाली होती. सासुरवाडी म्हणजे सागरचें माहेर. त्या काळांत जांवई घरीं येणें म्हणजे हलकेंसलकें काम नव्हतें. त्यांतून व्रजेश्वर सासुरवाडीला केव्हांच आला नव्हता. तो येणार असें कळल्यामुळें सारा गांव हुरळून उठला होता. प्रत्येक जण आपापल्या परीनें जांवईबापूंचें गडगंज स्वागत करण्यासाठीं सज्ज होत होता.

ज्याच्यासाठीं हीं सारी खटपट चालली होती तो कांहीं सुखासमाधानानें सासुरवाडीला आला नव्हता. बापाच्या गिरफदारीचा परवाना निघाला होता—कर्जाऊ पैसे द्यायला कुणी तयार नव्हता—व्रजेश्वरच्या सासऱ्याकडे पैसा होता, त्यानें कर्जाऊ पैसे दिले तर पहाण्यासाठीं तो सासुरवाडीला आला होता.

त्याचा सासरा म्हणाला, "असं पहा, माझा हा पैसा आहे तो सारा तुझ्याचसाठीं आहे. माझं दुसरं कोण आहे ? हा पैसा जोंवर माझ्या हातीं आहे तोंवर तो शाबूत आहे. तुझ्या बापाच्या हातीं गेला तर तो देणेकरांच्या देण्यापायीं जाईल. आपली संपत्ति तूं आपणच कां नष्ट करतोस ?"

व्रजेश्वर म्हणाला, "मला पैशाचा लोभ नाहीं. माझ्या बापाचा बचाव करायचा हें आहे माझं पहिलं काम."

त्याचा सासरा रुक्षपणें म्हणाला, "तुझ्या बापाच्या बचावाचं मला काय होय ? पैसा असला तर माझ्या पोरीला सुख लागेल—सासऱ्याचा बचाव झाल्यानं कांहीं तिचं जन्माचं कल्याण व्हायचं नाहीं !"

व्रजेश्वरचा राग भडकला. तो म्हणाला, "तर मग आपली मुलगी अन् आपला पैसा घेऊन स्वस्थ बसा. तुम्हाला आपल्या जांवयाची कदर नाहीं हें मला कळून चुकलंय. माझा हा तुम्हाला शेवटचा रामराम."

बोलण्यानें बोलणें वाढलें आणि शेवटीं वर्दळीवर आलें. व्रजेश्वर आपला बाडबिस्तारा बांधून जायला निघाला, हें ऐकून सागरला मोठा धक्का बसला. सागरच्या आईनें जावयाला बोलावून घेऊन अनेक प्रकारें त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण त्याचा राग गेला नाहीं. त्यानंतर आली सागरची पाळी. तिनें व्रजेश्वरला गांठून त्याचे पाय धरले. ती म्हणाली, "आणखी एक दिवस थांबा—मी तर कांहीं अपराध केला नाहीं !"

व्रजेश्वरचा राग अधिकच भडकला. त्या रागारागांतच सागरच्या हातांतून पाय सोडवून घेतांना अगदीं नकळत त्याचा पाय तिला जोरानें लागला. त्यासरशीं सागर चिडलेल्या नागिणीसारखी एकदम उठून उभी राहिली. ती उद्गारली, "तुम्ही लाथ मारली मला ?"

वास्तविक व्रजेश्वरचा तसा उद्देश नव्हता. त्यानें तसें बोलून दाखवलें असतें कीं तें प्रकरण मिटलें असतें. पण तो रागांत होता. त्यांत चिडून सुस्कारे सोडणारी सागर त्याला समोर दिसली, त्यामुळें त्याचा तोल सुटला. तो म्हणाला, "लाथ मारली म्हणून काय झालं ? तूं मोठ्या माणसाची बेटी असशील !—पण हे पाय आहेत माझे. बडा माणूस असलेल्या तुझ्या बापानें एक दिवशीं या पायाची पूजा केली होती."

आतां सागरचाही तोल सुटला. होता. ती म्हणाली, "त्यानीं त्यावेळीं चूक मारली. मी आतां त्याचं प्रायश्चित्त करीन."

"म्हणजे उलटून मला लाथ मारशील ?" व्रजेश्वरानें विचारलें.

"तेवढी मी अधम नाहीं !" सागर म्हणाली, "मी जर ब्राह्मणाची मुलगी असेन तर तुम्ही—"

"—माझे पाय हातीं घेऊन नोकरासारखे तुम्हाला चुरायला लावीन !" सागरचें वाक्य पुरें होण्यापूर्वी हे शब्द मागल्या खिडकींतून ऐकूं आले.

सागर असेंच कांहींतरी बोलणार होती. तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. रागाच्या भरांत तिनें तेच शब्द उच्चारले, "—माझे पाय हातीं घेऊन नोकरासारखे तुम्हाला चुरायला लावीन !"

व्रजेश्वरचा रागदेखील सतमाला चढला होता. तोही इकडे तिकडे न पहातां म्हणाला, "मीही तेंच म्हणतोंय. तुझे पाय मी जोपर्यंत हातीं घेऊन चुरले नाहींत, तोपर्यंत मी तुझं तोंड पहाणार नाहीं. ही प्रतिज्ञा जर भंग पावली तर मी ब्राह्मणच नव्हे म्हणून समज."

रागानें भिरभिरत व्रजेश्वर निघून गेला. सागर फतकल मारून रडत बसली होती. व्रजेश्वर गेला असें पाहून एक दासी आंत आली. तिला पाहतांच सागरनें विचारलें, "खिडकीवाटे तूं का बोललीस?" ती 'नाहीं.' म्हणाली तेव्हां सागर म्हणाली, "तर मग पहा पाहूं खिडकींत कोण आहे तें."

साक्षात् भगवतीसारखी रूपवती आणि तेजस्विनी अशी एक स्त्री आंत आली. ती म्हणाली, "खिडकींत मी होतें."

सागरनें विचारलें, "कोण ग तूं?"

ती स्त्री म्हणाली, "तुम्ही कुणी मला ओळखीत नाहीं. मी देवी चौधुराणी!"

दासीच्या हातीं पानाचें तबक होतें तें घणकन् आवाज करून खालीं पडलें. ती बोबडी वळून कांपत कांपत मटकन खालीं बसली आणि आरडाओरडा करूं लागली. देवी चौधुराणी त्या दासीला म्हणाली, "चूप रहो हरामजादी! खडा रहो!"

दासी कांपत कांपत रडत रडत सुन्न होऊन उभी राहिली. सागरही घामाघूम झाली होती. तिच्या तोंडावाटे शब्द बाहेर फुटत नव्हता. तिनें आतां जें नांव ऐकलें तें पोरापासून थोरापर्यंत सर्वत्रांना माहित झालेलें होतें. तें नांव अगदीं भयानक होतें.

सागर पहिल्यानें सुन्न झाली होती—नंतर ती क्षणभर थांबली—तिनें त्या स्त्रीकडे पाहिलें आणि एकदम हंसायला सुरवात केली. तें पाहून देवी चौधुराणीही हंसूं लागली.

## — २ —

पावसाळ्याचे दिवस. रात्रीं चांदणें पडलें होतें. तेंही मोठें मलूल होतें. उजळ नव्हतें. तिस्रोता नदी तुडुंब भरून वहात होती. या नदीच्या कांठाजवळ एक मोठी नौका उभी होती. तिच्याच पलीकडे कांठावरच्या चिंचेच्या झाडाच्या छायेंत आणखी एक होडी होती.

या मोठ्या नौकेला फार उत्तम रीतीनें सजविलेलें होतें. चोहीकडे चकचकीत आणि झगझगीत पितळेच्या मुठी आणि चांदीचा मुलामा दिलेल्या सामानानें ती शृंगारलेली होती. नाविकलोक एका झांकलेल्या छपरींत झोपलेले होते. वरच्या सज्जावर एक माणूस पहारा देत होता तेवढाच काय तो जागा होता.

पलीकडल्या मोठ्या छपरींत सर्वत्र राजेशाही थाट होता. तिथें एका गालिचा-वर सुमारें पंचवीस वर्षे वयाची स्त्री बसलेली होती. ती फार सुंदर होती. हातीं वीणा घेऊन ती निरनिराळे राग छेडीत होती. त्या वीणेचा झंकार त्या नौकेंत सर्वत्र प्रतिध्वनित होत होता.

तितक्यांत छपरीच्या दारावरचा पडदा उघडून एक लंबाचौडा पेहलवानवजा पुरुष येऊन त्या स्त्रीसमोर उभा राहिला. जवळ येतांच त्यानें विचारलें, “ काय झालंय ?”

वीणेच्या तारा छेडतांनाच त्या स्त्रीनें त्या पुरुषाला खुणेची हांक दिली होती. त्या स्त्रीनें विचारलें, “ दिसत नाहीं का तुला ?—पहा. ”

गालीच्यावर एक दुर्बीण पडली होती. हा जिन्नस त्यावेळीं नुकताच भारतांत आला होता. तिनें ती दुर्बीण कांहीं न बोलतां त्याच्या हातीं दिली. दुर्बीण हातीं घेऊन तो नदीच्या चारी बाजूंना पाहूं लागला. शेवटीं एका जागीं एक मोठी नौका दिसतांच तो म्हणाला, “ हंः, पाह्यलं—ही नौकाच दिसतेय्—”

ती म्हणाली, “ या नदींत आजकाल अशी मोठी नौका यायचा संभव नव्हता !—” तो अजूनही दुर्बिणींतून पहातो आहे असें पाहून तिनें विचारलें, “ काय पहातोयस् रंगराज ? ”

“ नौकेवर किती लोक आहेत तें पहातों आहें. नीटसं दिसत नाहीं, पण फार नसावे असं वाटतं. छिप सोडूं ? ”

“ छिप् सोडा. काळोखांतून मुकाट्यानें जा. ”

चिंचेच्या झाडाच्या छायेंत एक होडी काळोखांत लपवून ठेवली होती, तीच ही ‘ छिप् ’.-बंगालमधली ही होडी साठ हात लांब आणि तीन हात रुंद अशी असते. त्यांत पन्नास माणूस वल्हीं मारायला असतात. रंगराजकडून खुणेचा आवाज मिळतांच सगळेजण ‘ छिप् ’ सोडून नौकेजवळ होडी घेऊन आले. रंगराज आंत उतरला. तो उतरत असतांना ती स्त्री त्याला हांक मारून म्हणाली, “ मी सांगितलं आहे तें नीट लक्षांत ठेवा. ”

ती छिप् काठाकाठानें जात होती. रंगराजानें दुर्बिणींतून पाहिलेली नौका पाण्याच्या झोताबरोबर जोरानें येत होती. ती जवळपास येतांच छिप् कांठ खेटून त्या नौकेपाशीं जायला निघाली. पन्नास वल्हीवाले होते पण एवढासुद्धां आवाज होत नव्हता.

या नौकेच्या धाब्यावर आठ हिंदुस्थानी पहारेकरी होते. एवढे लोक बरोबर असल्याशिवाय त्या दिवसांत रात्रीच्या वेळीं नौका सोडायचा कुणालाही धीर होत नसे. या आठ जणांपैकी दोघे सशस्त्र होते, ते धाब्यावर बसले होते आणि बाकीचे सहाजण बाजूला झोपीं गेले होते. पहाऱ्यावरच्या एकाने छिप येतांना पाहून साद दिला, " छिप् बाजूला घ्या. "

रंगराजनें उत्तर दिलें. " तूंच हो बाजूला. "

पहारेकऱ्याला वाटलें, कीं यांना जरा भीति दाखवावी. त्यानें बंदुकीचा नुसता आवाज केला तेव्हां रंगराज हंसला आणि म्हणाला, " क्यौं ? पांडेजी ! एकसुद्धां छर्रा नाहीं का तुमच्याकडे ? उसने देऊं का ?" असें म्हणून त्याच्या माथ्याकडे लक्ष देऊन त्यानें बंदुक रोखली.—लगेच बंदुक खाली घेऊन तो म्हणाला, " यावेळीं मारीत नाहीं तुला. तुझी लाल पगडी उडवतों. " असें म्हणून त्यानें बंदुक ठेवून तीर घेतला आणि एक तीर सोडून त्या पहारेकऱ्याच्या डोक्यावरची लाल पगडी उडवली. तो ' राम राम ' म्हणत केकाटूं लागला.

पहातां पहातां छिप् नौकेच्या मागच्या बाजूला भिडली. छिप्मधले दहाबारा लोक हत्यार घेऊन वर चढले. वरचे पहारेकरी तयारींत नव्हते. अर्थात् या लोकांनीं त्या पहारेकऱ्यांना पाहतां पाहतां बांधून टाकलें.

छिप्मधील लोक आंतल्या छपरींत शिरायला गेले, त्यावेळीं दार बंद होतें. आंत व्रजेश्वर होता. सासुरवाडीहून तो आपल्या घरीं जायला निघाला होता. रात्रीच्या वेळीं नौका हांकारण्याचें हें प्रायश्चित त्याला मिळालें होतें.

छपरीच्या दारावर थाप मारून रंगराज म्हणाला, " महाशय, दार खोला. "

झोपेंतून उठत व्रजेश्वर आंतून म्हणाला, " कोण आहे ? कसली गड-बड आहे ही ? "

रंगराज म्हणाला, " ही गडबड नव्हे. डाका पडलाय तुमच्या नौकेवर ! "

व्रजेश्वरनें हांका मारायला सुरवात केली, " पांडे ! तिवारी ! रामसिंग ! "

रामसिंग धाब्यावरून ओरडून म्हणाला, " धर्मावतार ! साला सब लोकको बांधके रक्खा है."

व्रजेश्वर हंसला, " फार वाईट झालं. तुमच्यासारख्या वीरपुरुषांना डाळरोटी खायला घालायच्या ऐवजी बांधून टाकलं का त्यांनीं ? हे डाकु अगदींच मूर्ख

दिसतात. कांहीं काळजी करूं नका रामसिंग, उद्यांपासून तुझा डाळरोटीचा शिधा दुप्पट वाढवतों."

तें ऐकून रंगराज हंसला आणि म्हणाला, " अगदीं बरोबर. मलाही तसंच वाटतं. आतां दार उघडावं महाराज."

व्रजेश्वरनें विचारलें, " कोण तूं ?"

" एक डाकू आहें. दार उघडायची मागणी करतोंय."

" दार कशाला उघडायचं."

रंगराज म्हणाला, " तुमचं सर्वस्व लुटायचं आहे आम्हाला."

" काय समजलांत तुम्ही ?" व्रजेश्वर म्हणाला, " भेकड भय्ये समजलांत ? माझ्या हातीं दोन नळीची बंदूक आहे. तयार आहे. जो पहिल्यानं आंत येईल त्याला गोळी घालीन."

रंगराज म्हणाला, " एक नव्हे, अनेक येतील आंत. कितीजणांना माराल ? तुम्ही ब्राह्मण आहां, मीही ब्राह्मण आहें. उगीच एकतर्फी ब्रह्महत्या होईल. कशाला उगीच पापांत पडतां ?"

व्रजेश्वर म्हणाला, " कांहीं हरकत नाहीं. तें पाप लागूं दे मला."

त्याच्या तोंडांतून ते शब्द बाहेर पडतात न पडतात तोंच दुसऱ्या बाजूचें दार फोडून एक डाकू आंत शिरला. हातांतली बंदूक फिरवून व्रजेश्वरनें ती त्याच्या डोक्यावर मारली. डाकू मूर्च्छित होऊन खालीं पडला. इकडे पहिल्या बाजूचें दार फोडून रंगराज आंत शिरला. व्रजेश्वर बंदूक फिरवून त्याच्यावर रोखीत होता तोंच रंगराजनें ती त्याच्या हातून काढून घेतली. दोघेही सारखेच बलवान् होते. पण रंगराज जास्त चपळ होता. व्रजेश्वरनें त्याच्यावर मूठ मारली तोंच रंगराजनें त्याचा हात पकडला. बरींच हत्यारें टांगलेलीं होतीं, पण तितक्यांत व्रजेश्वरनें चपळाई करून जवळच टांगून ठेवलेल्या हत्यारांतली एक तलवार हातीं घेऊन उपसली आणि हंसत म्हटलें, "पहा ठाकूर, मी ब्रह्महत्त्येला भीत नाहीं."

व्रजेश्वर रंगराजवर वार करणार तोंच आंत शिरलेल्या चारपांच डाकूंनीं त्याला पकडून तरवार त्याच्या हातून काढून घेतली. दोघांनीं त्याचे दोन हात पकडले. तिसरा हातीं दोरी घेऊन आला आणि म्हणाला, " आतां बांधू का तुम्हांला ?"

व्रजेश्वर म्हणाला, "बांधायचं काम नाहीं. मीं पराजय स्वीकारतों. काय हवंय बोला? मीं देतों."

रंगराज म्हणाला, "असेल नसेल तें सारं आम्ही घेऊन जाणार. थोडंबहुत सोडलं असतं, पण तुम्ही ती मूठ उगारली होती ती माझ्या डोक्यावर बसली असती तर माझं डोकं फुटलं असतं. आतां मी एक दमडीही सोडणार नाहीं."

"ठीक आहे!" व्रजेश्वर म्हणाला, "नौकेंत असेल नसेल तें घेऊन जा. माझी कांहीं हरकत नाहीं."

त्यानें असें म्हणण्यापूर्वीच सुमारें पंचवीस लोक नौकेवर चढून आले होते. त्यांनीं नौकेवरचा माल खालीं करायला सुरवात केली होती. नौकेंत फारसा माल नव्हताच. नुसती रोजच्या उपयोगाचीं वस्त्रं आणि पूजेचें सामान होतें. ते सारे जिन्नस त्यांनीं छिपमध्यें उतरून घेतले.

"झालं तुमचं समाधान?" व्रजेश्वर म्हणाला "आतां जा आपल्या वाटेनं."

रंगराज म्हणाला, "जातोंच आहें.—पण तुम्हीसुद्धां आलं पाहिजे आमच्याबरोबर."

"तें काय म्हणून? अन् कुठं?"

"आमच्या राणीपाशीं!"

"कोण तुमची राणी? डाकूंची राणी असल्याचं मला माहित नव्हतं."

"देवी राणीचं नांव आलं आहे का तुमच्या कानीं?"

"ओहो!" व्रजेश्वर म्हणाला" तुम्हीं देवी चौधुराणीच्या टोळक्यांतले का?"

"टोळकं कसलं?" रंगराज म्हणाला, "आम्ही राणीचे बरकदाज आहों."

"जशी राणी तसे तिचे बरकंदाज!" व्रजेश्वर म्हणाला "तुमच्या राणीला भेटायला मीं कशाला यायला हवं?

"जरूर यायला हवं." रंगराज म्हणाला, "नौकेंत कांहीं फारसं मिळालं नाहीं. तुम्हांला अटकेंत ठेवलं तर कांहीं वसुली करतां येईल."

"मलाही यायचंच आहे तुमची राणी पाह्यला." व्रजेश्वर म्हणाला, "ती म्हणे मोठी देखणी आहे. तरुण आहे का ती?"

"आमची 'मा' आहे ती." रंगराज म्हणाला, "संतानं आपल्या माच्या वयाचा विचार करीत नाहींत."

" खरोखरच सुंदर आहे का ती ? "

" आमची मा म्हणजे मूर्तिमती भगवती ! "

" तर मग चला या भगवतीच्या दर्शनाला ! " असें म्हणून व्रजेश्वर रंगराजबरोबर छपरीच्या बाहेर आला.

त्याला दिसून आलें कीं त्याच्या नौकेवरचे सारे नावाडी पाण्यांत उडी टाकून दोरीला लोंबकळत होते. व्रजेश्वरनें त्यांना म्हटलें, " आतां चढा वर नौकेवर. भिऊं नका. वर जाऊन अल्लाचं नांव घ्या. तुमचा जान, मान, दौलत अन् इज्जत सारीं शाबूत आहेत. तुम्ही फार हुशार आहां बेट्यानों ! — "
त्यानें रंगराजला विचारलें, " आतां या पहारेकऱ्यांनाही सोडणार आहां का ? "

रंगराज म्हणाला, " कांही हरकत नाहीं—पण सुटल्याबरोबर जर ते आमच्यावर चाल करून येतील तर तुमचं डोकं उडवलं जाईल, हें त्यांना सांगून ठेवा. "

व्रजेश्वर त्या सर्वांना म्हणाला, " इथं आतां बिनदिक्कत नौकेवर बसून रहा. कुठं जाऊं नका कीं हल्लाचाल करूं नका. मीं आतांच परत येतों. " असें म्हणून तो रंगराजबरोबर छिपमध्यें उतरला.

' देवी राणी की जय ! ' अशी हांक ठोकून नावाड्यांनीं छिप चालू केली.

## — ३ —

होडींतून जात असतांना व्रजेश्वरनें रंगराजला विचारलें, " किती दूर जायचं आहे आपल्याला ? "

" ही नौका दिसतेय् ना समोर ? हीच तिची नौका ! "

" हीच का ? मला वाटलं होतं कीं इंग्रजांचं जहाज म्हणून. रंगपूर लुटायला आलंय. एवढं मोठं जहाज कशाला हवंय तुमच्या राणीला ? "

" राणीला राणीसारखंच राह्यलं पाहिजे ना ? " रंगराज म्हणाला, " सात कमरे आहेत त्या जहाजावर. "

" इतक्या कमऱ्यांत कोण कोण रहातं ? "

"एकांत दरबार, एकांत राणीचं शेजघर, एकांत नोकराणी रहातात. एक न्हाणीघर, एक सैंपाकघर, आणि एक आहे—त्यांतच तुम्हांला आज राहावं लागेलसं वाटतं —"

ते अशा प्रकारें बोलत होते तोंच छिप् येऊन नौकेला भिडली. आतां देवीराणी वर उभी नव्हती. छिप् परत येते आहे असें पाहून ती खालीं उतरून आपल्या खोलींत गेली होती.

रंगराज वर आला आणि राणीच्या खोलीच्या दारावर येऊन म्हणाला, "राणीजीकी जय!"

आंतून देवीनें विचारलें, "काय खबर?"

"सारं कांहीं ठीक."

"तुमच्यापैकीं कुणी जखमी झालंय्?"

"तसं कुणी विशेष नाहीं. एकजण थोडासा खरचटला आहे."

"माल?"

"सारा आणलाय्. विशेष कांहीं नव्हतंच."

"बाबू?"

"बाबूला पकडून आणलंय."

"हजर करा."

रंगराजनें ब्रजेश्वरला छिप् चालवून वर घेतलें आणि देवीराणीच्या दाराशीं आणून उभें केलें.

देवीनें विचारलें, "आपण कोण?" देवीचा आवाज नीट नव्हता. दाटल्यासारखा वाटत होता.

ब्रजेश्वरच्या वृत्तीची आतां कल्पना येईल. लहानपणापासून तो अगदीं निर्भय होता. ज्या देवी चौधुराणीचें नांव ऐकतांच सारा उत्तर बंगाल कांपत असे तिच्यासमोर येतांच त्याला हंसू आलें. तो म्हणाला, "माझी ओळख कशाला हवी? माझा पैसा हवा आहे तुम्हाला. तो मिळालाय. आतां नांव कशाला हवं?"

देवीराणी म्हणाली, "तुम्ही कोणत्या दर्जाचे लोक आहांत तें कळलं म्हणजे पैसे किती उकळायचे तें ठरवतां येईल."

व्रजेश्वर यानंतर आपलीं निरनिराळीं काल्पनिक नांवें सांगूं लागला. तें देवीला पटलें नाहीं. बोलत असतांना देवीचा गळा दाटून येत होता असें पाहून दुसरी एक स्त्री येऊन तिच्या शेजारीं बसली. तिला देवी म्हणाली, " आतां हें नाटक करणं मला झेंपत नाहीं. तुला सारं कांहीं माहीत आहे. तूंच यांच्याशीं बोल. "

देवी तिथून उठून पलीकडल्या खोलींत गेली आणि निशी रिकाम्या जागीं बसून देवी म्हणून बोलूं लागली.

शेवटीं व्रजेश्वरनें एकदांचें आपलें खरें नांव सांगितलें तेव्हां निशी म्हणाली, " आतां जें सांगितलंत ते मात्र तुमचं खरं नांव—व्रजेश्वरराय. "

व्रजेश्वरला शंका आली कीं बोलणाऱ्याचा आवाज बदलला आहे. पहिला आवाज फार गोड लागत होता. आतांच्या बोलणाऱ्याच्या आवाजांत तेवढी गोडी नव्हती. तो म्हणाला, " आतां माझी ओळख पटली ना ? आतां काय तें ठरवून मला सोडून द्या पाहूं ! काय घेणार आहां मला सोडून देण्यासाठीं ? "

निशी म्हणाला, " एक कवडी ! आहे का बरोबर ? नसली तर आपल्या नौकेंतून आणून द्या. "

" नौकेंत जेवढं कांहीं होतं तेवढं सारं तुमच्या माणसांनीं लुटून आणलं आहे. आतां एक कवडीसुद्धां नाहीं तिथं. " व्रजेश्वर म्हणाला.

" तर मग आतां ती मिळेपर्यंत इथं कैदेंत राहा. "

व्रजेश्वरला ऐकूं आलें, कीं देवीराणीबरोबर कुणीतरी बोलत आहे. कुणी स्त्री देवीला म्हणत होती, " राणीजी, या माणसाला सोडायला जर एक कवडीचीच खंडणी असेल तर ती मी देतें. मला विकत द्या हा माणूस ! "

राणी उत्तर देत होती, "कांहीं हरकत नाही—पण या माणसाचा तुला काय उपयोग ? हा आहे ब्राह्मण ! लांकडं फोडणं, भांडी घासणं असलीं कामं व्हायचीं नाहींत याच्या हातून ! "

ती स्त्री सांगत होती, " मला सैंपाकाचा ब्राह्मण हवाय्. हा करील माझा सैपाक ! "

निशी व्रजेश्वरला उद्देशून म्हणाली " ऐकलंत ना ? तुम्हांला विकण्यांत आलं आहे. मला खंडणी मिळाली आहे. जिनं तुम्हांला विकत घेतलं, तिच्याबरोबर जा. तिचा सैंपाक करावा लागेल तुम्हांला. "

व्रजेश्वर म्हणाला, "कोण आहे ती ?"

"बाई माणूस आहे ती—" निशी म्हणाली, "ती बाहेर यायची नाहीं. तुम्हीच आंत या."

व्रजेश्वर पडदा उघडून आंत आला. आंत येतांच तो आश्चर्यचकित झाला. त्या खोलीच्या भिंती लाकडी होत्या आणि उत्सवाच्या दिवसांत सजवतात त्याप्रमाणें चित्रें टांगून ती भिंत सजवलेली होती. जिकडे तिकडे सोन्यारुप्याचें सामान होतें. ती ऐश्वर्याची पराकाष्ठा पाहून तो थक्क झाला.

आंत येतांच त्याला दिसून आलें, कीं तिथें एक स्त्री झोंपून राहिली होती. तिला तो म्हणाला, "कोणत्या नांवानं राणीजींना आशीर्वाद देऊं ?"

ती म्हणाली, "मीं राणीजी नाहीं."

आपल्याशीं जी बोलत होती, तिचा हा आवाज नव्हे, ती कृत्रिम आवाज काढते आहे, असें व्रजेश्वरला वाटलं. कुणी सांगावें ? ही देवी चौधुराणी मायाविनीही असेल. कसला तरी जादूटोणा माहित असल्याशिवाय काय ती अशी डाकूगिरी करीत होती ? त्यानें उघडपणें विचारलें, "मीं जिच्याबरोबर बोलत होतों ती कुठंय ?"

"तुम्हांला आंत यायला सांगून ती निघून गेली." ती स्त्री म्हणाली, "तुम्हांला कशाला हवी ती ? आतां तुमचा संबंध आहे माझ्याशीं. मीं तुम्हाला एक कवडी देऊन विकत घेतलं आहे."

"तर मग तुम्हांला कोणत्या नात्यानं आशीर्वाद देऊं ? सधवेला द्यायची पद्धत वेगळी, विधवेला वेगळी ! पुत्रवतीला वेगळी, अन्—"

"मला 'मर एकदांची' असा आशीर्वाद द्या."

"असला आशीर्वाद मीं कुणाला देत नसतों—तुला १०३ वर्षं परमायु होवो."

"माझं वय आहे पंचवीस वर्षं. आणखी ७८ वर्षें मला सैपाक करून वाढायची तयारी आहे का तुमची ?"

"आधीं एक दिवस तर सैपाक करतों—त्यांतून बचावलांत तर पुढं ७८ वर्षं !"

"तर मग बसा. तुम्हांला काय काय रांधतां येतं तें सांगा."

व्रजेश्वर तिथल्या मखमली गालिचावर बसला. तिनें त्याला विचारलें, “ नांव काय तुझं ? ”

“ तुम्हां साऱ्यानांच माझं नांव माहीत आहे. ” व्रजेश्वर म्हणाला, “ माझं नांव व्रजेश्वर. तुझं नांव काय ? असा भसाडा आवाज कशाला काढतेस ? ”

ती म्हणाली, “ मीं मालकीण आहें तुझी. मला ‘ आपण ’ ‘ बाईसाहेब ’ ‘ जी ’ असं म्हणायला हवं. ”

“ जी बाईसाहेब ! ” तो म्हणाला, “ आपलं नांव काय ? ”

“ माझं नांव पांचकोडी—तूं नोकर आहेस माझा. माझं नांव घ्यायचं नाहींस तूं. अन् मीही तुला तुझ्या नांवानं हाक मारणार नाहीं. मीं म्हणेन तुला ‘रामधन’, तूं मला म्हणायचं, ‘मालकीणसाहेब.’ आता सांग तुझं घर कुठंय् ? ”

“ एक कवडीमोलाच्या माणसाची एवढी चौकशी कशाला ? ”

“ ठीक आहे. नको सांगूं. रंगराज सांगेल मला. बरं, कोणत्या शाखेचा ब्राह्मण तूं ? राढी ? बारेन ? कीं वैदिक ? ”

“ हातचं जेवण खायचंय्, तिथं शाखेची चौकशी कशाला ? ”

“ तूं आमच्या शाखेचा नसलास तर तुला दुसरं काम द्यावं लागेल. म्हणजे पाणी भरणं, लाकडं फोडणं—कामाला काय तोटा आहे ? ”

“ मीं राढी. ”

“ तर मग तुला लांकडं फोडणं आणि पाणी काढणंच करायला हवं. मीं आहे बारेन. गोत्र काय तुमचं ? ”

“ हें कशाला विचारतां ? इथं काय लग्न जमवाचंय् ? मीं आहें विवाहित.”

“ विवाहित का ? किती लग्नं झालींयत् तुमची ? ”

“ पांणी भरायचं असलं तर पाणी भरीन. जास्त विचारायचं काम नाहीं. ”

ती स्त्री राणीला हांक मारून म्हणाली, “ राणीजी, हा भटजी मोठा हट्टी दिसतोय् विचारल्या प्रश्नांचीं उत्तरं देत नाहीं. ”

“ छडी लगाव ! ” असें निशीनें आंतून सांगितलें. त्याचवेळीं एक वेताची छडी तिच्या बिछान्याकडे फेंकली गेली. ती स्त्री तशीच निजून राहिली होती. तिनें आपल्या तोंडावर एक डाक्याच्या मलमलीचा रुमाल टाकला होता. त्यांतून दिसून आलें कीं ती हंसते आहे. व्रजेश्वरला ती म्हणाली, “ पाहिलीत ही छडी ? ”

व्रजेश्वर हंसला आणि म्हणाला, "तुम्ही इथल्या बायका हवं तें कराल! आतां विचारा प्रश्न! मीं उत्तर देतों."

"तुमच्या हातचं अन्न कांहीं मला चालायचं नाहीं. आतां असं सांगा, तुम्हांला काय येतं? पाणी भरतां येतं? नाहीं? लांकडं फोडतां येतात? नाहीं? बाजारहाट करतां येतो?—"

"साधारण ठोकळपणें."

"ठोकळपणें चालायचं नाहीं. —वारा घालतां येतो? मग घ्या हा पंखा आणि वारा घाला पाहूं मला."

व्रजेश्वर पंखा घेऊन वारा घालूं लागला तेव्हां ती म्हणाली, "आणखी एक काम येतं कां? पाय दाबतां येतात का?"

ती स्त्री मोठी शब्दवेल्हाळ आहे, असें पाहून जरा आपली रसिकता दाखवावी आणि सुटका होते कीं काय तें पहावें अशा उद्देशानें तो म्हणाला, "तुझ्यासारख्या सुंदरीचे पदसेवन करायचं भाग्य जर मला —"

"तर मग चुरा माझे पाय." असें म्हणून तिनें आपले पाय शेजारीं बसलेल्या व्रजेश्वरच्या मांडीवर ठेवले. व्रजेश्वरचा नाइलाज झाला. त्यानें होऊनच हा प्रसंग ओढवून आणला होता. तो हळूहळू तिचे पाय दाबूं लागला. त्याला वाटत होतें, कीं हें कांहीं बरें होत नाहीं. सुटकेचा हा उपाय असला तरी उद्यां प्रायश्चित्त केलें पाहिजे.

तो पाय दाबीत असतां ती चांडाळीण म्हणाली, "राणीजी, जरा इकडे या." राणी येत आहे असें वाटून व्रजेश्वरनें तिचे पाय खालीं ठेवून दिले. ती स्त्री आंत आपल्या खऱ्या आवाजांत म्हणाली, "हें काय? आतां हटता कां?"

व्रजेश्वर चकित झाला. हा आवाज त्याच्या ओळखीचा होता. तिच्या तोंडावर असलेला रुमाल त्यानें धीर करून काढून घेतला त्यावेळीं ती स्त्री खुदखुदून हंसली. व्रजेश्वर थक्क होऊन म्हणाला, "हें काय? तूं! सागर तूं?"

ती म्हणाली, "मीं सागर. गंगा नव्हे, यमुना नव्हे, ओढा नव्हे, नाला नव्हे, साक्षात् सागर!—सागर म्हणून कळतांच अभाग्य वाटलं का? परकी स्त्री म्हणून वाटत होतं, तोपर्यंत तिचे पाय दाबणं भाग्याचं म्हणत होतां. आतां घरची स्त्री म्हणतांच मागं हटतां काय? कांहीं हरकत नाहीं. माझी प्रतिज्ञा तर

पुरी झाली आहे. तुम्ही माझे पाय चुरलेत. आतां खुशाल माझं तोंड पहा, मला टाकून द्या कीं पायाशीं ठेवा, आतां निश्चित ठरलं कीं मीं खरी ब्राह्मणाची बेटी !"

— ४ —

व्रजेश्वर कांहींकाळ अस्वस्थ होऊन राहिला होता. नंतर त्यानें विचारलें, "सागर, तूं इथं कशी ?"

सागर म्हणाली, "सागरचे पतिराज, तुम्ही इथं कसे ?"

"असं आहे का हें !" व्रजेश्वर म्हणाला, "मीही कैदी, अन् तूंही कैदी—मलाही पकडून आणलंय् अन् तुलाही पकडून आणलंय्—असंच ना ?"

"मीं कैदी नाहीं," सागर म्हणाली, "मीं आपखुषीनं देवी राणीची मदत घ्यायला आलें. तुम्हांला माझे पाय चुरायला भाग पाडायचं म्हणून राणीच्या राज्यांत येऊन राहिलें."

यावेळीं निशी आली. तिचा एकंदर थाट पाहून तीच देवी चौधुराणी असें समजून तो उठून उभा राहिला, तेव्हां निशी म्हणाली, "स्त्री डाकू असली तरी तिला एवढा मान द्यायला नको कांहीं. बसा तुम्ही. आतां आमचे लोक तुमच्या नौकेवर कां चाल करून गेले तें कळलं ना ? सागरची प्रतिज्ञा पुरी झाली. आतां तुमची आम्हांला जरूरी नाहीं. आपलं सारं सामानसुमान आपल्या नौकेवर पाठवून देण्यांत येईल. पण या कवडीचं काय ? ही मेली काळतोंडी सागर ! हिचं काय व्हायचं ? हिनं आपल्या माहेरीं जायचं कीं तुम्ही हिला घेऊन जातां ? एक कवडी देऊन हिन तुम्हांला विकत घेतलंय्. तुम्हीं गुलाम आहां हिचे, हें ध्यानीं आहे ना ?"

व्रजेश्वरला आश्चर्याचे धक्क्यावर धक्के बसत होते. तो म्हणाला, "तुम्ही लोकांनीं बनवलं मला ! मला वाटत होतं, की माझ्या नौकेवर दरोडा घातला तों देवी चौधुराणीच्या टोळक्यानं !"

"खरोखरच ही देवी चौधुराणीची नौका !" निशी म्हणाली, "देवीराणी खरोखरच दरोडेखोर आहे—"

व्रजेश्वर मध्येंच म्हणाला, "म्हणजे काय ? तुम्ही देवी चौधुराणी नव्हे का ?"

"मी देवी नाहीं." निशी म्हणाली, "राणीला तुम्हांला पाहायचं असेल तर कदाचित् ती तुम्हांला दर्शन देईल देखील. पण आधीं माझं ऐका. आम्ही डाकूगिरी करतों खरे, पण तुमच्यावर दरोडा घालायची आम्हांला इच्छा नाहीं. केवळ सागरची प्रतिज्ञा पुरी करण्यासाठींच हें घडलं. आतां पुढं सागरचं काय? कुठं जाणार ती?"

"इथं कशी आली ती?" व्रजेश्वरनें विचारलें.

"राणीजी बरोबर."

"मीं तर तिच्याच माहेरीं गेलों होतों. तिथूनच येत होतों. तिथं राणीजी कुठं दिसली नाहीं ती मला."

"तुम्ही तिथून गेल्यावर राणीजी तिथं गेली होती."

"तर मग, इतक्यांत ती इथं आली कशी!"

"छिप पाहिलीत ना आमची!—पन्नास वल्हीवाले असलेली."

"तर मग त्या छिपमधूनच सागरला पोचवून द्या कीं."

निशी म्हणाली, "त्याला एक अडचण आहे. सागर कुणाला न सांगतां राणीबरोबर आलीय. आतां ती दुसऱ्या कुणाबरोबर जर परत गेली तर ती कुठं गेली होती म्हणून चौकशी सुरू होईल. तुमच्याबरोबर जर गेली तर प्रश्नच मिटला."

"ठीक आहे. तसंच करूं." व्रजेश्वर म्हणाला, "तुमची छिप द्या आम्हांला."

"ती व्यवस्था करूं—" असें म्हणून निशी निघून गेली.

ती जातांच व्रजेश्वर सागरला म्हणाला, "कां अशी प्रतिज्ञा केलीस?—"

सागर तोंडावर पदर ओढून आंतल्या आंत रडत होती. तें पाहून त्यानें विचारलें, "तूं मला कां मागं फिरायला सांगितलं नाहींस? तूं बोलावलं असतंच कीं साराच प्रश्न मिटला असता. मींसुद्धां आलों असतों—मागं फिरलों असतों. पण तूं मला निघून जायला सांगितलं होतंस." यावर सागर कांहीं बोलली नाहीं असें पाहून तो म्हणाला, "या दरोडेखोरांबरोबर तूं कां?"

सागर म्हणाली, "ही देवी चौधुराणी नात्यानं माझी बहीण होते. आमची पूर्वींची ओळख होती. तुम्ही निघून गेलांत अन् ती तिथं आली. मीं रडत होतें, असं पाहून ती म्हणाली, 'रडतेस कशाला? तुझ्या शामसुंदरला मीं पकडून आणून

तुझ्या स्वाधीन करतें. दोन दिवस चल माझ्याबरोबर.' म्हणून मीं आलें. आतां हें पाहिलंत! तुमच्यासाठीं हा हुक्का, गुडाखू, सारा तयार ठेवलाय्. ही फराळाची देखील तयारी आहे."

व्रजेश्वर म्हणाला, "घरचा मालक तर कांहीं सांगत नाहीं."

सागरनें देवीला हाक मारली, पण निशी आली, तेव्हां व्रजेश्वर म्हणाला "आपण छिप् दिली कीं मीं जाईन म्हणतों."

"छिप् तुमचीच आहे!" निशी म्हणाली, "असं पहा, तुम्ही राणीच्या बहिणीचे पति. तुमचा कांहीं आदरसत्कार करायच्या ऐवजीं आम्ही अपमानच केला. आम्ही डाकू असलों तरी हिंदूपणा कांहीं सोडला नाहीं. आम्ही कुणाच्या द्रव्याचा अपहार करीत नाहीं. नुसतं सोनं रुपं अन् हिरेमाणकं सोडून!"

"मग मीं काय पितळेकाशाच्या सदरांत येतो?"

निशी म्हणाली, "आमच्या हिशेबी पुरुषमाणूस ही स्त्रियांची मत्ता! पुरुषाशिवाय संसार थाटत नाहीं, म्हणून ही वस्तु राखायची. त्या वस्तूवर गंज चढूं नये म्हणून रोज घासून पुसून ठेवायची—बरं का सागर, ही आपली मालमत्ता आतां ताब्यांत घे. नाहींतर गंज चढेल त्यावर."

"हीं हंडीमडकीं आहेत स्त्रीचीं. मातीचीं नव्हेत, पितळ कांशाचीं."

"मीं आहें वैष्णवी. आम्हीं असल्या हंड्यामडक्यांची पर्वा करीत नाहीं."

सागर म्हणाली, "पण मीं आहे संसारी. हंडीमडकींच काय, घागर कळशीही हवी असते आम्हांला. हा रिकामा कळसा आम्ही पूर्णकुंभ करतों पाणी भरून."

"अगदीं बरोबर." निशी म्हणाली, "हें पहा, हा पाण्याचा कळसा गळ्यांत बांधून संसारसमुद्रांत बुडून मरायला सोपं. घे ग बाई हा तुझा कळसा अन् ठेव चांगला घासूनपुसून."

निशीनें आग्रह केल्यामुळें व्रजेवर मसनदेवर बसला त्याक्षणीं दोन दासी येऊन हातांत चवरी घेऊन त्याला वारा घालूं लागल्या. निशी सागरला म्हणाली, "जा आतां तूं आपल्या नवऱ्यासाठीं स्वहस्तें हुक्का तयार करून आण."

सागरनें हुक्का भरून आणून व्रजेश्वरला दिला तेव्हां निशी सागरला म्हणाली, "अग वेंधळे, बघत काय राहिलीस? पुरुषमाणसानं हुक्क्याची नळी तोंडाला

लावली कीं त्याच्या बायकोनं काय करायचं तें कळत नाहीं का तुला ? आधीं त्यांना फराळाचं द्यायचं—मग विडा करून द्यायचा."

व्रजेश्वर म्हणाला, "एवढ्या रात्रीं फराळाचं ? माफ करा बाईसाहेब."

"फराळाचंच कां ?" निशी म्हणाली, "आतां भोजन करा इथं. चला उठा, पलीकडच्या खोलींत जेवण वाढून तयार आहे."

व्रजेश्वर तिच्यासमोर हात जोडून म्हणाला, "दरोडा घालून तुम्ही मला पकडून आणलंत. तो अत्याचार मीं सहन केला. पण एवढ्या रात्रीं हा जेवायचा अत्याचार नाहीं सहन व्हायचा मला !"

त्या बायका हट्टाला पेटल्या होत्या. त्यांच्या समजुतीसाठीं व्रजेश्वरनें थोडें-बहुत खाऊन घेतलें. सागर निशीला म्हणाली, "ब्राह्मणभोजन झालंय्, आतां दक्षिणा द्यायला हवी."

निशी म्हणाली, "दक्षिणा द्यायची ती राणीसाहेब स्वतः देतील. चला, आतां चला राणीसाहेबांकडे." असें म्हणून निशी व्रजेश्वराला घेऊन पलीकडल्या खोलींत गेली. तिथें देवीचें शेजघर एकाद्या दरबारी दिवणखान्यासारखें सजवलेलें असल्याचें त्याला दिसून आलें. यावेळीं देवी चौधुराणी आपले सर्व दागदागिने टाकून अगदीं साध्या वस्त्रानिशी आली होती.

व्रजेश्वर येतांच देवी उठून उभी राहिली आणि तिनें त्याला प्रणाम केला. व्रजेश्वराला आश्चर्य वाटलें. अजून इथें कुणीच त्याला प्रणाम केला नव्हता. देवीला समोर पहातांच व्रजेश्वरला ती खरोखरच देवीसारखी वाटली. त्याला वाटलें, हा चेहरा पूर्वी कधीं पाहिला होता का ? पूर्वी एकदां कधींतरी हा असाच एक, पण छोटासा चेहरा त्याला पाहिल्याचें आठवलें. पण चेहऱ्यांत साम्य कुठें असत नाहीं ? ती तर कित्येक दिवसांपूर्वी मरून गेली होती.

पण त्या सादृश्याचा व्रजेश्वरच्या मनावर परिणाम झाला आणि त्याचे डोळे पाणावले. तें देवीच्या नजरेला आलें नाहीं म्हणून बरें, नाहींतर काय झालें असतें तें सांगतां आलें नसतें.

खालच्या मानेनें देवी बोलत होती, "मी आपल्याला जबरदस्तीनं धरून आणलं—फार कष्ट दिले आपल्याला. क्षमा असावी."

व्रजेश्वर म्हणाला, "ते उपकारच झालेयत माझ्यावर—" त्याच्यानें याहून जास्त बोलवलें नाहीं.

देवी म्हणाली, "आपण माझ्या घरीं तोंड गोड केलं—माझी मर्यादा राखली. आपण कुलीन आहां—आपली मर्यादा राखणं माझं कर्तव्य आहे. त्यासाठीं मी जें कांहीं देतें आहें त्याचा स्वीकार व्हावा."

व्रजेश्वर म्हणाला, "आणखी काय देणार आपण ? सर्वांत मोठं धन म्हणजे स्त्रीधन. ती आपण मला दिली—"

बापबेट्यांनीं प्रफुल्लला घरांतून हांकलून दिलें त्यावेळीं व्रजेश्वरच्या हें ध्यानांत होतें का ? तें स्त्रीधन नव्हतें का ?

बैठकीच्यापाशीं एक चांदीची कळशी होती. ती समोर आणून देवी म्हणाली, "याचा स्वीकार व्हावा."

व्रजेश्वर म्हणाला "आपल्या या नौकेंत सोन्याचांदीची एवढी उधळमाधळ झालेली आहे, कीं ही कळशी मी नको म्हटली तर सागर माझ्यावर तोंड टाकील, पण एक सांगायचं आहे—"

"हा दरोडेखोरीचा माल नव्हे," देवी म्हणाली "माझी स्वतःच्या मिळकतींतील वस्तु आहे. कांहीं संकोच नको बाळगायला."

कुलीन ब्राह्मणाचा मुलगा आणि अध्यापक भट्टाचार्य हे गृहस्थाची 'मर्यादा' स्वीकार करायला शरमत नाहींत. अर्थात् व्रजेश्वरनें ती कळशी घेतली. त्याला ती बरीच जड वाटली. तो म्हणाला, "हें काय ? यांत काय आहे ?—" आंत हात घालून पाहतो तों ती मोहरांनी भरलेली होती. तें पाहून तो म्हणाला, "या आंतल्या मोहरा कुठं ओतून ठेवूं ?

"तें सारं कांहीं तुमच्यासाठीं आहे." देवी म्हणाली.

"किती मोहरा आहेत ह्या ?

देवी म्हणाली, "तेहतीसशें."

"तेहतीसशें मोहरा म्हणजे पन्नास हजारावर रुपये होतात." व्रजेश्वर म्हणाला, "सागरनं सांगितलं वाटतं आपल्याला ? म्हणून का देतांहां ?"

"पैसे माझे नव्हेत." देवी म्हणाली, "ते कुणाला द्यायचा मला अधिकार नाहीं. हें देवस्व आहे. त्यांतून आपल्याला हें कर्ज म्हणून दिलंय."

"माझ्या बापाच्या अब्रूचा प्रश्न आहे म्हणून मी हे घेतों." व्रजेश्वर म्हणाला, "पण हें फेडायचं केव्हांपर्यंत ?"

" देवाची संपत्ति देवाला पोंचली कीं झालं. " देवी म्हणाली, " माझ्या मृत्यूची बातमी तुम्हाला कळली कीं मूळ रक्कम आणि व्याजाची एक मोहोर देवसेवेला खर्ची घातलीत कीं झालं. "

" म्हणजे तुमची फसवणूक करण्यासारखं आहे हें—मला हें कबूल नाहीं."

" तर मग आपल्याला वाटेल त्या रीतिनें ही फेड करा. "

व्रजेश्वर म्हणाला, " पैसा माझ्या हातीं आला कीं मी तो आपल्याकडे पोंचता करीन—किंवा स्वतः घेऊन येईन. "

" कुठं याल ? माझं रहाण्याचं स्थान एक नाहीं. "

" तुम्ही सांगाल तिथं येईन. "

देवी म्हणाली, " तुम्ही दिवस ठरवा कीं मी जागा सांगतें. "

" माघ फाल्गुनच्या सुमाराला माझी वसुली येईल." व्रजेश्वर म्हणाला, " पण थोडे अधिक दिवस सांगितलेले बरे—वैशाख महिन्यांत ही फेड करीन. "

देवी म्हणाली, " ठीक आहे. वैशाख महिन्याच्या शुक्ल पक्षाच्या सप्तमीच्या रात्रीं याच घाटावर पैसे घेऊन या. सप्तमीच्या चंद्रास्तापर्यंत मी वाट पाहीन. चंद्रास्त झाला कीं माझी भेट व्हायची नाहीं. "

व्रजेश्वरनें तें कबूल केलें. देवीनें मोहरेचा घडा छिपेंत नेऊन ठेवायला दिला. देवीला आशीर्वाद देऊन व्रजेश्वर जायला निघाला तेव्हां देवी म्हणाली, "जरा थांबा. आता मी दिलं तें कर्ज—अजून 'मर्यादा' द्यायची राहिली आहे—अन् ती आपल्याला साजेशी पाहिजे !" असें म्हणून तिनें आपल्या बोटांतली आंगठी काढली. व्रजेश्वरनें ती घेण्यासाठीं हात पुढें केला, पण देवीनें व्रजेश्वरचा हात हातांत घेतला आणि आंगठी बोटांत घातली.

व्रजेश्वर जितेंद्रिय होता तरीही त्याच्या हृदयांत मोठें काहूर माजलें. असें कां झालें तें त्याला कळेना. सर्वांगावर रोमांच उभे राहिले. अंतरंगांत अमृताची झरणी पाझरली. जितेंद्रिय व्रजेश्वर तिच्या हातांतून हात सोडवून घ्यायला विसरला.

व्रजेश्वरच्या बोटांत ती आंगठी घालीत असतांना देवीच्या डोळ्यांतील दोन उष्ण अश्रु व्रजेश्वरच्या हातावर पडले. देवीचे डोळे आसवांनीं भरून आलेले पाहून त्याच्या हृदयाच कलकलाट झाला. पुन्हां त्याला तें छोटेसें मुखकमल आठवलें. त्या रात्रीं तिच्या डोळ्यांतून अशीच आसवें वाहिलीं होतीं.

व्रजेश्वरचा तोल सुटला. त्यानें आपला हात देवीच्या खांद्यावर ठेवला. दुसऱ्या हातानें त्यानें तिचा चेहरा वर उचलून धरला—त्याला तो चेहरा प्रफुल्लसारखा वाटला असावा—तो बेमान झाला. त्यानें त्या आसवांनीं भिजलेल्या पिकल्या तोंडल्यासारख्या ओठांना—छे छे ! व्रजेश्वर ! पुन्हां हें !

व्रजेश्वरच्या मस्तकावर वज्रघात झाला. काय केलं हें ? ही काय प्रफुल्ल होती ? दहा वर्षांपूर्वी मेली ना ती ?

व्रजेश्वर तसाच पळून गेला आणि छिपेंत उतरला. सागरला सुद्धां त्यानें बरोबर घेतलें नाहीं. 'धरा, धरा—पकडा ! कैदी पळाला !' असें म्हणत सागर त्याच्या मागोमाग धांवत छिपेंत उतरली. दोघेंही तिथून निघालीं तीं कळशी-सकट जाऊन व्रजेश्वरच्या नौकेवर पोंचलीं.

निशी आंत येऊन पहाते तों देवी नौकेंतल्या तक्तपोशीवर पडून रडत होती. आपल्या पदरानें तिचे डोळे पुसून निशी म्हणाली, "हें काय ? हाच का तुझा निष्काम धर्म ? हाच का संन्यास ? भगवन्ताचें वाक्य विसरलीस का यावेळीं ?"

देवी यावर कांहीं बोलली नाहीं असें पाहून निशी म्हणाली "तें कठोर व्रत बायकांसाठीं नव्हे. बायकांना जर या मार्गानं जायचं असलं तर माझ्यासारखं व्हायला हवं. मला रडायसाठीं कुणी व्रजेश्वरच नाहीं. माझा व्रजेश्वर एक वैकुंठेश्वर."

डोळे पुसून देवी म्हणाली "तूं जा यमेश्वराच्या घरीं !"

"कांहीं हरकत नाहीं." निशी म्हणाली, "पण माझ्यावर यमाची सत्ता चालायची नाहीं. तूं मात्र आतां हा संन्यास टाकून घरीं जा."

"मार्ग मोकळा असता तर मी या मार्गाला आलेंच नसतें." देवी म्हणाली, "आतां शिडं उभारून नौका हांकारायला सांग."

## — १० —

व्रजेश्वर आपल्या नौकेवर आला. तो गंभीर होऊन बसला होता. सागरबरोबर सुद्धां तो बोलला नाहीं. देवीची नौका शिडें उभारून पक्षासारखी उडून गेली असें पाहिलें तेव्हां व्रजेश्वर सागरला म्हणाला, "कुठं गेलं हें गलबत ?"

"तें देवीशिवाय कुणालाच कळायचं नाहीं." सागर म्हणाली, "ती कुणालाच कांहीं सांगत नाहीं.

व्रजेश्वरनें विचारलें, "ही देवी कोण ?"

"देवी म्हणजे देवी !"

"पण ही तुझी कोण ?"

"बहिण."

"कसली बहिण ?"

"लांबची बहिण."

व्रजेश्वरनें आपल्या नावाड्याला हांक मारली आणि विचारलें, "त्या गलबताच्या मागोमाग आपलं गलबत जाईल का ?"

नावाडी म्हणाले, "शक्यच नाहीं. तें तीरासारखं गेलं निघून."

व्रजेश्वर पुन्हां स्तब्ध बसून राहिला. सागरही झोंपीं गेली.

पहाटे व्रजेश्वरचें गलबत चालू झालें. सूर्योदय झाल्यावर सागर व्रजेश्वरपाशीं आली त्यावेळीं त्यानें तिला विचारलें, "ही देवी दरोडेखोरी कां करते ? सारं लक्षण दिसलं तसंच. तरीपण मला खरं वाटत नाहीं."

"कां खरं वाटत नाहीं ?" सागरनें विचारलें.

"दरोडे घातल्याशिवाय एवढी संपत्ति येईल कुठून ?"

सागर म्हणाली, "कुणी म्हणतात, तिला देवतेच्या वरानं द्रव्य मिळालंय. कुणी म्हणतात, भूमिगत द्रव्य मिळालंय, कुणी म्हणतात तिला किमया माहित आहे—ती सोनं बनवते—"

"पण देवी काय म्हणते ?"

"देवी म्हणते, हें सारं कांहीं माझं नव्हे."

"ही संपत्ति जर तिची नव्हे, तर तिची ही अमिरी कशी चालते ?"

"ती कुठं करते आहे अमिरी ? ती कदन्न खाते, जमिनीवर झोंपते, खादी नेसते. काल तुम्ही पाहिलं तें तिचं सारं सोंग—नुसती दुकानदारी !—तुमच्या हातांत काय तें ?" त्याच वेळीं व्रजेश्वरच्या हातांतली आंगठी तिला दिसली.

व्रजेश्वर म्हणाला, "काल देवीच्या नौकेंत जेवण केल्यावर देवीनं मला ही दक्षणा दिली."

सागर ती आंगठी घेऊन पाहूं लागली. ती म्हणाली, " त्यांत फारशी भाषेंत देवीचं नांव लिहिलंय वाटतं ? "

व्रजेश्वरनें ती अंगठी घेऊन पाहिली तेव्हां तो थक्क झाला. तो म्हणाला, " हें काय ? हें तर माझं नांव ! ही माझीच अंगठी ! तुला माझी शपथ आहे सागर, खरं सांग, ही देवी कोण ? "

" तुम्ही तिला ओळखली नाहींत हा काय माझा दोष ? मी तर तिला पहिल्या सपाट्याला ओळखली. ती प्रफुल्ल होती. "

व्रजेश्वर सुन्न झाला. पहिल्यानें तो रोमांचित झाला. त्याच्या चेहऱ्यावर अनिर्वचनीय आनंदाची, सुखाच्या उसळलेल्या वादळाची छाया दिसली. पण ती क्षणभरच. सागरला दिसून आलें, कीं दुसऱ्याच क्षणाला ती लाट उसळून गेली. लगेच त्याच्या चेहऱ्यावर विषादाचे ढग दिसूं लागले. तो तारवटल्या-सारखा सागरच्या तोंडाकडे पहात होता. पहातां पहातां तो थकल्यासारखा झाला आणि सागरच्या मांडीवर डोकें टेंकून आडवा झाला. काय झालें म्हणून सागर सारखी विचारीत होती. तो नुकताच उद्गारला, " प्रफुल्ल डाकू ? छे छे ! "

देवी चौधुराणीची नौका ठरलेल्या जागीं पोंचली तेव्हां देवीनें पाण्यांत उतरून स्नान केलें. तीच खादीची साडी ती नेसली होती. तिनें आपल्या कपाळाला आणि हृदयाला गंगेतली माती लावली. तिचे ओले केंस पाठभर रुळत होते. गेल्या रात्रींच्या सोन्यामोत्यानें मढवलेल्या मूर्तीपेक्षां ही निराभरण मूर्ति प्रत्यक्ष देवतेसारखी दिसत होती.

त्याच वेषांत ती एकच स्त्री बरोबर घेऊन नदीकांठीं गेली आणि पलीकडे दिसणाऱ्या जंगलांत शिरली. या काळांत त्या देशांत जिकडे तिकडे जंगलेंच जंगलें होतीं आणि त्या जंगलांतून सर्वत्र डाकू लोक वावरत होते. या डाकूंचे निर्दालन करण्यासाठीं मार्किस ऑफ हेस्टिंग्ज्ला जेवढ्या लढाया लढवाव्या लागल्या, त्यांच्यापुढें पंजाबची लढाई कांहींच नव्हे. डाकूगिरी करणें हें त्यावेळचें वीरत्वाचें लक्षण होतें. त्यांत कुणाला कमीपणा वाटत नव्हता. जे कुणी दुबळे होते किंवा मूर्ख होते, ते सज्जनपणाचा आव आणून घरीं बसून रहात होते.

देवी जंगलाच्या अंतर्भागांत खूप दूर गेली. एका झाडापाशीं थांबून ती दासीला म्हणाली, “ तूं इथंच बैस. मी जाऊन येतें. इथें श्वापदांचं भय फार कमी आहे. आणि तीं आलीं तरी भ्यायला नको. आपले लोक तिथं पहाऱ्यावर आहेत. ”

देवी तिथून निघाली ती अधिकच घनदाट जंगलांत शिरली. तिथें एक तळघर होतें. त्यांत खालीं उतरायला दगडी जिना होता. ज्या जागेतून खालीं उतरायचें तिथें काळोख होता. पूर्वीचें हें देवालय असावें. आतां इथें चारी बाजूला माती पडल्यामुळें उतरायला पायऱ्या केलेल्या असाव्या.

देवी काळोखांतून पायऱ्या उतरून गेली. त्या तळघरांतल्या मंदिरांत एक मिणमिणता दिवा तेवत होता. तिथें एक शिवलिंग होतें आणि एक ब्राह्मण त्याची पूजा करीत होता.

शिवलिंगाला नमस्कार करून ती थोड्या अंतराबर बसली तेव्हा त्या ब्राह्मणानें तिला विचारलें “ काल रात्रीं तूं काय करीत होतीस ? डाकूगिरी करीत होतीस ? ”

देवी म्हणाली, “ कोण जाणें काय तें ! आपण ओळखत नाहीं का मला ? आणि दहा वर्षं या डाकूंबरोबर मीं फिरते आहें, लोकांना वाटतं कीं, जे डाके पडताहेत ते माझ्याकरवीं, तरीपण एकही दिवस मीं तें काम केलं नाहीं, मग असं कां विचारतां ? ”

तो भवानी ठाकूर होता. तो म्हणाला. “ रागावतेस कां ? हे डाके आम्ही घालतों ते दुष्कर्म म्हणून नव्हे. असं मुळींच वाटून घेऊं नकोस. हीं गेलीं दहा वर्षं—”

“ आतां माझं मत बदलतंय्. ” देवी म्हणाली, “ इतके दिवस मीं फसलें, आतां फसणार नाहीं. दुसऱ्याची संपत्ति हिसकावून घेणं हें महापातक ! यापुढं मीं आपल्याशीं कोणताच संबंध ठेवणार नाहीं. ”

“ काय बोलतेस हें ? ” भवानी म्हणाला, “ इतके दिवस मीं तुला शिकवलं तें फुकटच का ? या द्रव्यांतील एक कवडीसुद्धां मीं घेतली असती तर तें महापातक झालं असतं. जे लोक दुसऱ्यांना नाडताहेत, त्याजपासून त्यांचं तें द्रव्य काढून घेऊन गरिबांना द्यायचं, हें माझं व्रत तुला नाहीं का माहीत ? या देशांत अराजक माजलं आहे, म्हणून तुला राणी करून आम्ही हा कारभार

चालवतों आहोंत, दुष्टांचं दमन आणि सुष्टांचं पालन करतों आहों, हा अधर्म का ? "

देवी म्हणाली, " ज्या कुणाला राजाराणी करायचं असेल त्याला खुशाल करा, मला आतां मोकळीक द्या. माझी जी संपत्ति आहे ती सारी मीं आपल्याला देतेंय्. आतां यापुढं काशीवास करावा असं वाटतंय् मला. मला डाकू म्हणून लोक ओळखतात, ही बदनामी मीं मेलें तरी पुसून जायची नाहीं. "

" बदनामी कसली ? " भवानी म्हणाला, " कोण कधीं नांव ठेवतंय् तुला ? सुख्यातीची लालूच धरली तर निष्काम कर्म कसं व्हावं ? तूं आपल्या घरांत पहातेयस्—पण दुसऱ्यांचं काय ? हें आत्मविसर्जन का ? "

देवी म्हणाली, " आपल्या बरोबर वाद घालायचं सामर्थ्य मला नाहीं. माझी आहे बायकी बुद्धि ! ही राणीगिरी आतां पुरे झाली. मला हें आवडत नाहीं ! "

" मग रंगराजाला काल डाका घालायला कां पाठवलंस् ? " भवानी म्हणाला, " मला कळलंय तें ! "

" कालचा तो डाका नव्हता—डाक्याचं सोंग होतं. " देवी म्हणाली, " एका माणसाला पकडून आणायचं होतं. "

" कुठल्या माणसाला ? "

देवीच्या ओंठावर तें नांव आलें पण बाहेर पडलें नाहीं. भवानीशीं प्रतारणा करणें योग्य नव्हे असें वाटून ती म्हणाली, " त्याचं नांव ब्रजेश्वर राय. "

" मीं ओळखतों त्याला. तुला कशाला हवा होता तो ? "

" त्याला कांहीं द्यायचं होतं. इजारदारांनीं त्याच्या बापाला कैद केलं होतं, म्हणून त्याला कांहीं देऊन ब्राह्मणाची इज्जत बचावायची होती. "

" त्याची कसली इज्जत ? " भवानी म्हणाला, " मोठा बदमाष आहे तो हरवल्लभराय. आपल्या विहिणीची इज्जत काढली होती त्यानं—"

" ती कशी काय ? " असें विचारतांना देवी शहारली.

भवानी म्हणाला, " त्याची एक सून होती. तिला एका विधवा आईखेरीज कुणी नव्हतं. हरवल्लभनं तिला दुश्चरित्रा ठरवून घरांतून घालवून दिलं. त्या धक्क्यानं त्या सुनेची आई मेली अन् ती सूनही अन्नाअभावीं मरून गेली."

" त्याच्याशीं काय करायचंय आम्हांला ?" देवी म्हणाली, " आम्हांला एकच पाह्यचं. दुःखी माणसाला दुःखमुक्त करणं !"

" कांहीं हरकत नाहीं." भवानी म्हणाला, " सध्यां पुष्कळ लोक दारिद्र्यानं गांजले आहेत. इजारदार लोक त्यांना छळताहेत. त्यांना उभं केलं पाहिजे. त्यांना बचावलं पाहिजे. त्याच्यासाठीं एकदां दरबार भरायला हवा."

देवी म्हणाली, " तर मग या सोमवारीं दरबार भरला जाईल असं जाहीर करा."

" नाहीं, " भवानी म्हणाला, " आतां तुला इथं रहातां यायचं नाहीं. इंग्रजांना या जागेचा पत्ता लागलाय्. पाचशें शिपाई घेऊन ते तुझा माग काढीत येताहेत. म्हणून आतां वैकुंठपूरच्या जंगलांत दरबार घेऊं. तिथं शिपायांना यायची छाती व्हायची नाहीं. सोमवारच्या पूर्वींच जरूर तेवढा पैसाअडका घेऊन वैकुंठपूरच्या जंगलांत जा."

" ठीक आहे," देवी म्हणाली, " पण यापुढं हें काम माझ्या हातून होईलसं वाटत नाहीं मला."

देवी तिथून निघाली आणि आपल्या नौकेवर गेली. रंगराजला बोलावून आणून तिनें गुपचूप सांगितलें, " येत्या सोमवारीं वैकुंठपूरच्या जंगलांत दरबार भरवायचा. आतांच नौका सोडून तिकडे जायला निघायचं. बरकंदाजांना देवीगडला जायला सांगा. तिथून द्रव्य आणलं पाहिजे."

नौकेचीं शिडें उठविण्यांत आलीं. आठ जवान बसलेली छोटी होडी नौकेला बांधली गेली. सर्वांनी 'राणीजी की जय' अशी आरोळी ठोकून नौका चालू झाली. नदीच्या कांठावरून बरेचसे लोक या होडीच्या मागानें धांवत जात होते. त्यांच्या हातांत नुसत्या लाठ्या होत्या. हत्यारें होतीं तीं नौकेंत. देवीचे बरकंदाज सैन्य तें हेंच !

सर्व व्यवस्था सुरळित झाल्यावर स्वहस्तानें आपला सैंपाक करण्यासाठीं देवी सैंपाकघरांत गेली.

## — ६ —

सोमवारीं सूर्योदय होतांच त्या घनदाट जंगलांत राणीचा दरबार भरला होता. त्या दरबारचें काम म्हणजे खटले चालवणें नव्हतें—गरिबगुरिबांना दान करणें म्हणजेच हा दरबार !

हें जंगल घनदाट होतें तरीही त्यांतली तीनशें बिघे जमीन सपाट करण्यांत आली होती. मात्र तिथलीं मोठीं झाडें छायेसाठीं राखून ठेवलीं होतीं. त्यावेळीं तिथें सुमारें दहा हजार लोक गोळा झाले होते. झाडांच्या फांद्यांना दोऱ्या ताणून शामियाना उभारला गेला होता. त्याच्याखालीं चांदीच्या एका मोठ्या चौरंगावर किनखापाचा चांदवा टांगला होता. त्याला मोत्यांची झालर होती. तिथें एक चंदनी वेदी होती. त्या वेदीवर एक गालिचा अंथरून त्यावर एक चांदीचें सिंहासन ठेवण्यांत आलें होतें. त्या सिंहासनावर जी मसनद होती तिलाही मोत्यांची झालर होती.

देवीनें आज बहुमोल पोषाख केला होता. तिच्या साडीवर हिऱ्यामाणकांचा कशिदा होता. तिच्या अंगावर दागिने खचून भरले होते. मस्तकावर रत्नजडित मुकुट होता. प्रत्यक्ष देवीची प्रतिमा असावी तशी ती दिसत होती.

दोन्ही बाजूला दोन स्त्रिया सोन्याच्या मुठींचीं चामरें घेऊन वारा घालीत होत्या. हातीं चांदीच्या काठ्या घेतलेले भालदार चोपदार आगें मागें उभे होते. जवळजवळ पांचशें बरकंदाज देवीच्या सिंहासनाच्या दोन्ही बाजूला उभे होते.

देवी येऊन सिंहासनावर बसली, त्यावेळीं त्या दहा हजार लोकांनीं एकमुखानें ' देवी राणीकी जय ' असा जयजयकार केला. त्यानंतर सुंदरवेषधारी दहा तरुणांनीं देवीसमोर येऊन मधुर कंठानें देवीचें स्तुतिगान केलें.

हा नित्यविधी झाल्यावर त्या दहा हजारांतल्या एका-एका याचकाला रंगराज देवीसमोर आणीत होता. देवीसमोर येतांच ते भक्तिभावानें तिला प्रणाम करीत होते. वयानें मोठे असोत कीं ब्राह्मण असोत, तिला प्रणाम करायला माघार घेत नव्हते. देवी ही प्रत्यक्ष भगवतीचा अवतार असून लोकांच्या उद्धारासाठीं अवतीर्ण झाली आहे, असाच सर्वांचा समज होता, म्हणूनच इंग्रजांनीं कितीही प्रयत्न केले तरी तिचा पत्ता लावून द्यायला त्या भागांत कुणीच तयार होत नव्हता.

देवी मोठ्या प्रेमळपणानें प्रत्येकाची ओळख करून घेत होती आणि तेही तिला आपल्या अडचणी सांगत होते. ज्याची जशी जरुरी होती तशीच ती त्याला दान देत होती. शेजारीं द्रव्यानें भरलेला भला मोठा घडा होता.

अशा प्रकारें दरिद्री लोकांना दान करीत असतांना संध्याकाळ उलटून एक प्रहर रात्र झाली. दान देण्याचें काम संपेपर्यंत देवीनें तोंडांत पाणी सुद्धां घेतलें नाहीं. हीच होती देवीची डाकूगिरी !

कांहीं दिवसांनीं रंगपूरच्या गुडलॅंड साहेबाला कळून आलें, कीं वैकुंठपूरच्या जंगलांत देवी चौधुराणीच्या असंख्य दरोडेखोरांची टोळी जमा झाली होती. अनेक दरोडेखोर राशी राशी द्रव्य घेऊन आपल्या घरीं गेले होते. अशा-प्रकारें द्रव्य घेऊन घरीं गेले होते, त्यांनीं त्या देणगीचा पत्ता कुणालाच लागूं दिला नव्हता. तें कळलें असतें, तर इजारदार लोकांनीं त्यांचें द्रव्य छिनावून घेतलें असतें. तरीपण सारे लोक हात सोडून खर्च करूं लागले त्यावेळीं सर्वांचा समज झाला, कीं यावेळीं देवी चौधुराणीनें पुष्कळच पैसा लुटला असावा.

योग्य वेळीं व्रजेश्वर आपल्या बापापाशीं आला. बापाला नमस्कार करतांच त्यानें विचारलें, "काय झालं रे व्रज ? पैशांचं जमलं का ?"

आपल्या सासऱ्यानें पैसा देण्याचें नाकारलें असें व्रजेश्वरनें सांगितलें, तेव्हां कपाळावर हात मारून घेऊन हरवल्लभ म्हणाला, "खरोखरच पैसे मिळाले नाहींत ? आतां काय करायचं ?"

"माझ्या सासऱ्यानं पैसे दिले नाहींत तरी दुसऱ्या एकाकडून ते मिळाले—" व्रजेश्वर म्हणाला.

"कुणाकडून ते मिळाले आहेत ? आधीं कां सांगितलं नाहींस मला ? देवा ! वचावलों एकदांचा."

व्रजेश्वर म्हणाला, "पण जिथनं पैसे मिळाले आहेत, तिथले पैसे घेणं उचित आहे कीं नाहीं, ते सांगतां येत नाहीं."

"कुठून मिळाले ?"

व्रजेश्वरने मान खालीं घातली. तो म्हणाला, "नांव मला नीटसं आठवत नाहीं. पण ती एक दरोडेखोर बाई आहे ना—"

"कोण ती ? देवी चौधुराणी ? होय ? तिच्याकडून पैसा कसा मिळाला ?"

व्रजेश्वरच्या प्राचीन नीतिशास्त्रांत सांगितलें होतें, कीं अशावेळीं बापाला फसवण्यांत दोष नाहीं. तो म्हणाला, "तशीच एक संधि आली म्हणून मिळाले पैसे !"

"दरोडेखोर माणसाकडचे पैसे—लखचपाटी कशी काय झाली आहे !"

व्रजेश्वर म्हणाला, "तशीच संधि मिळाली. तेव्हां लेखचपाटी करावी लागली नाहीं."

बापानें अधिक चौकशी करूं नये, अशा विचारानें खरी हकिकत न सांगतां व्रजेश्वर म्हणाला, " हा पापाचा पैसा, जो घेईल तोही पापाचा भागीदार होईल. मला वाटतं हा पैसा घेऊं नये. "

हरवल्लभ रागारागानें म्हणाला, " हा पैसा घेऊं नये तर काय तुरुंगांत जावं. कर्ज घ्यायचंय्—तें पापाचं कीं पुण्याचं त्याची उठाठेव कशाला ? आतां जपतपाचा पैसा आहे कुणापाशीं ? ती अडचण नको. मला अडचण वाटते ती हीच. दरोडेखोराचा पैसा, वर कांहीं लेखचपाटी न झालेली—भीति वाटते ती हीच—वेळीं देवी येऊन घरदार लुटून नेईल. "

यावर व्रजेश्वर कांहीं बोलला नाहीं असें पाहून हरवल्लभ म्हणाला, " केव्हांची मुदत दिलीय तिनं ? "

"येत्या वैशाख महिन्याच्या शुक्ल सप्तमीच्या चंद्रास्तापर्यंत." व्रजेश्वर म्हणाला.

हरवल्लभ म्हणाला, " ही डाकू बाई कुठंच सांपडत नाहीं—तिचे पैसे तिला कुठं नेऊन पोंचवायचे ? "

व्रजेश्वर म्हणाला, " त्या दिवशीं संध्याकाळनंतर संधानपूरच्या कालसाजी घाटावर ती एका नौकेंत असेल, तिथं तिला तो पैसा पोंचवायचा. "

हरवल्लभ म्हणाला, " ठीक आहे. त्याच दिवशीं तिचा पैसा आपण पोंचता करूं. "

व्रजेश्वर निघून गेल्यावर हरवल्लभ आपल्या मनाशीं विचार करूं लागला. विचारांतीं त्यानें ठरवलें, " वाः रे बेटी ! हिचं ऋण फेडायला हवं होय ! बेटीला शिपायांच्या ताब्यांत दिली, कीं सारीच ऋणाची फेड होऊन जाईल. वैशाखी सप्तमीच्या दिवशीं संध्याकाळीं कप्तानसाहेब आपली पलटण घेऊन तिच्या नौकेवर चढून गेला नाहीं, तर तर माझं नांव हरवल्लभ नव्हे ! मग कर्जफेडीची ददात आपोआपच चुकेल ! "

या अत्यंत पुण्यमय अशा कृतनिश्चयाची गोष्ट हरवल्लभनें मनांतल्या मनांत ठेवली. व्रजेश्वरला सांगितली नाहीं. त्याच्यावर त्याचा विश्वास नव्हता.

इकडे सागर ब्रह्मआत्याकडे आली होती. ती त्या म्हातारीला सांगत होती कीं व्रजेश्वर एका महाराणीच्या नौकेवर गेला होता. तिथें त्यानें त्या राणीशीं लग्न केलें. आपण पुष्कळ विनवणी केली पण त्यानें ऐकलें नाहीं. ती मेली आहे कुणीतरी मांग धेड—तिचीं म्हणे आणखी दोन लग्नें झालीं आहेत—आत

ब्रजेश्वर बाटला. यापुढें आपण त्याच्या उष्ट्या ताटांत जेवणार नाहीं म्हणून प्रतिज्ञा केली आहे.

आत्याबाईनें ब्रजेश्वरला विचारून रुजवात करून घ्यायचें ठरवलें. ब्रजेश्वरनें आपला अपराध कबूल केला. तो म्हणाला, " राणीच्या जातीची बातमी खोटी आहे. ती आमच्या बाबांच्या बाबांच्या आत्याची कुणीतरी होते. अन् लग्नाच्या बाबतींत काय म्हणायचं ! तिचीहीं तीन लग्नं आणि माझींही तीन लग्नं ! "

या मान्या गोष्टी बनावट आहेत, नुसती थट्टा आहे, हें त्या म्हातारीला कळून चुकलें. सागरचा उद्देश एवढाच होता, कीं ती बातमी तिनें नयनतारेला सांगावी ! आणि झालेंही तसेंच !

बातमी नयनतारेच्या कानीं गेली. सागर आल्यामुळें आधींच नयनतारा भडकली होती. आतां आपल्या नवऱ्यानें एका म्हाताऱ्या बाईशीं लग्न केलें आहे असें कळतांच तिच्या अंगाला आग लागली. अर्थात कांहीं दिवसपर्यंत ब्रजेश्वरला नयनतारेच्या आजूबाजूला फिरकायला सुद्धां कठीण गेलें. तो आतां सागरच्याच महालांत राहात होता.

सागरचा उद्देश तडीला गेला खरा, पण नयनतारा अगदींच भडकली होती. शेवटीं ती सासूबाईपाशीं गेली. सासूबाई म्हणाल्या, " तूं अगदींच वेडी आहेस पोरी ! ब्राह्मणाचा मुलगा काय धेडाच्या पोरीशीं लग्न करील ? सारेच तुला बनवतात अन् मग तूंही भडकतेस ! "

तरी पण नयनतारेची समजुत पटली नाहीं. ती म्हणाली, " अन् खरोखरच जर त्यांचं लग्न झालं असेल तर ? "

सासूबाई म्हणाल्या, " लग्नच केलें असेल त्यानं, तर मग सुनेला घरीं नको का आणायला ? मुलाच्या बायकोला काय टाकून देतां येतंय् ? "

तितक्यांत ब्रजेश्वर आला असें पाहून नयनतारा पळत गली. ब्रजेश्वरनें विचारलें, " काय म्हणत होतीस आई ? "

आई म्हणाली, " मीं असं म्हणत होतें, कीं तूं जर पुन्हां लग्न केलंस, तर तुझी ती नवी बायको मीं मोठ्या आनंदानें घरीं घेऊन येईन. "

ब्रजेश्वर अस्वस्थ झाला. कांहींसुद्धां न बोलतां निघून गेला.

संध्याकाळीं घरवाली मालकांना वारा घालीत उभी होती. तिनें हळूच अदबीनें सारी हकीकत पतिराजांच्या कानीं घातली. मालकांनीं विचारलें, " तुझं मत काय आहे ? "

घरवाली म्हणाली, "मीं असं म्हणतें आहें, कीं सागर, ही सून कांहीं घरीं राहात नाहीं! नयनतारा आहे, पण ती माझ्या मुलाला साजेशी नाहीं! म्हणून म्हणतें, कीं माझा व्रज एकादी चांगलीशी मुलगी पाहून संसार थाटीत असेल, तर मीं नको कां म्हणूं ?"

मालक म्हणाले, "हें जर त्याला पटत असेल तर मला सांग—मीं कुणाला तरी मध्यस्थ घालून चांगलंसं स्थळ पाह्यचा प्रयत्न करीन."

घरवाली म्हणाली, "बरं आहे, मीं एकदां त्याच्या मनाचा ठाव घेऊन पाहातें."

व्रजेश्वरच्या मनाचा ठाव घेऊन पाह्यचें काम आत्याबाईवर सोपवलें गेलें—आत्याबाईनें व्रजेश्वरला विरहानें पोळलेल्या आणि विवाहास उत्सुक झालेल्या एका राजपुत्राची कहाणी सांगितली. तरीही व्रजेश्वरच्या 'मनाचा ठाव' लागला नाहीं.

शेवटीं म्हातारीनें सरळ सरळच विचारलें. त्याचाही फारसा परिणाम झाला नाहीं. व्रजेश्वर एवढेंच म्हणाला, "माझे आईबाप मला जी आज्ञा करतील ती मी मुकाट्यानं पाळीन."

यापुढें या बाबतींत फारशी वाच्यता झाली नाहीं—



# तृतीय खंड

## १

वैशाख शुक्ल सप्तमी आली पण देवीराणीचें कर्ज फेडायचें कोणतेंच लक्षण दिसेना. हरवल्लभ यावेळीं कर्जमुक्त झाले होते. अर्थात देवीचें कर्ज फेडण्यासाठीं पैसा गोळा करणें त्यांना अशक्य नव्हतें, पण त्यांनीं तिकडे लक्षच दिलें नव्हतें. व्रजेश्वरनें दोनचार वेळ कर्जफेडीची गोष्ट काढली पण हरवल्लभनें त्याला उडवाउडवीचीं उत्तरें दिलीं.

वैशाख शुक्ल सप्तमीला दोनचार दिवस राहिले होते त्यावेळीं व्रजेश्वरनें जिद्द केल्यामुळें हरवल्लभ नोकरचाकर घेऊन घराबाहेर निघाला. त्याचा उद्देश निराळाच होता. रंगपूरला जाऊन तो कलेक्टरला भेटला आणि म्हणाला, " माझ्याबरोबर शिपाई द्या. मीं देवी चौधुराणीला पकडून देतों. तिला पकडून दिलं तर मला काय बक्षिस द्याल ? "

तें ऐकून साहेब खूष झाला. देवी चौधुराणीला पकडणें आजवर त्याला अशक्य झालें होतें. तिला पकडून दिल्यास चांगलेंच बक्षिस देण्याचें त्यानें कबूल केलें. हरवल्लभच्या मागणीप्रमाणें त्याच्याबरोबर पांचशें शिपाई आणि लेफ्टनंट ब्रेनन् यांना देण्यांत आलें.

व्रजेश्वरनें ज्या घाटावर देवी भेटेल असें सांगितलें होतें, त्या घाटावर ती मोठ्या नौकेंत राहाणार होती, म्हणून लेफ्टनंट ब्रेनन कांहीं फौज पांच होड्यांत विभागून देवीच्या नौकेला वेढा देण्यासाठीं निघाला. बाकीचें सैन्य कांठावर जंगलांत छपून राहिलें होतें. नौकेंतून पळून देवी कांठावर गेली तर हे छपून राहिलेले शिपाई तिला घेरणार होते. होड्या येत असलेल्या पाहून देवी जर नदींत भाट पडलेल्या जागेनें जायचा प्रयत्न करील, तर तिला अडविण्यासाठीं दोन कोस अंतरावर भाट पडल्या जागीं कांहीं सैन्य ठेवण्यांत आलें होतें.

एका संन्यासिनी स्त्रीला पकडण्यासाठीं एवढा मोठा खटाटोप करण्यांत येत होता. कारण तिच्या अंमलाखालीं हजारों योद्धे होते, हें साहेबाला माहीत होतें. ते नुसते लाठीबाज होते खरे, तरीपण समशेरीचा हात जायबंदी करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगी होतें.

जिच्या लाठीच्या भीतीमुळें एवढे शिपाई गोळा झाले होते तिच्यापाशीं एक सुद्धां लाठी नव्हती कीं लाठीबाजही नव्हता. व्रजेश्वरला ज्या घाटावर कैद करून आणण्यांत आलें होतें, त्याच घाटावर देवीची नौका उभी होती. नुकतीच संध्याकाळ उलटली होती. नौका तशीच सजविलेली होती, पण तिच्या जोडीला असलेली पन्नास नावाड्यांची लंबी होडी तिथें नव्हती. नौकेवर एकही पुरुष हजर नव्हता. नावाडी किंवा रंगराजसुद्धां नव्हता. मात्र नौकेचीं शिडें उभारलेलीं होती. नौकेचा नांगर टाकला नव्हता. केवळ दोन दोरखंडांनीं तीरावरच्या खुंट्यांना नौका बांधून ठेवलेली होती.

आज देवीच्या अंगावर रत्नखचित आभरणें नव्हतीं. तिनें सर्वांगावर चंदनाचे टिळे लावले होते. मस्तकावर फुलांचा मुकट, हातांत फुलाचे अलंकार होते. सोन्यामोत्यांच्या दागिन्यापैकीं कोणताच दागिना तिच्या अंगावर नव्हता. ती एक जाडीभरडी साडी नेसली होती.

नौकेच्या धाब्यावर आज ती एकटीच नव्हती. दिवा आणि निशी या दोघीही तिच्या शेजारीं होत्या.

दिवा होती अशिक्षित. ती म्हणत होती, "हो! परमेश्वर कुणीं प्रत्यक्ष पाहिलाय का?"

प्रफुल्ल म्हणाली, "नाहीं. तो प्रत्यक्ष दिसत नाहीं. मीं म्हणत होतें कीं परमेश्वराला प्रत्यक्ष करायला हवं. एक आहे चाक्षुष प्रत्यक्ष—म्हणजे डोळ्याला दिसेल तें! माझा आवाज तुला ऐकूं येतोय—तें झालं श्रवण प्रत्यक्ष! या फुलाचा वास तुला येतोय—तें घ्राणज प्रत्यक्ष! आतां मीं तुझ्या गालावर एक थप्पड मारतें अन् ती तुला जाणवली तर तें झालं त्वचा प्रत्यक्ष! कांहीं खाल्लं अन् त्याची रुचि कळली—कीं तें झालं रसना प्रत्यक्ष—"

"तें खरं आहे." दिवा म्हणाली, "पण परमेश्वर दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं, हुंगतां येत नाहीं, कीं शिवतां येत नाहीं—खातां तर येत नाहींच नाहीं. मग तो प्रत्यक्ष व्हायचा कसा?"

निशी म्हणाली, " आणखी एक प्रत्यक्षीकरणाचं इंद्रिय आहे."

" कोणतं तें ? दांत का ? "

" दूर हो काळतोंडे !" निशी म्हणाली, " एक थप्पड मारून तुझी ती बत्तिशी पाडून टाकीन."

देवी हंसत हंसत म्हणाली, " डोळे वगैरे पंच ज्ञानेंद्रियें, हातपाय वगैरे पांच कर्मेंद्रियें–इंद्रियाधिपति मन–त्या मनाच्या द्वारें या दहाही इंद्रियाना जें ज्ञान होतें तें मानस प्रत्यक्ष ! ईश्वर मानसप्रत्यक्ष आहे !"

निशी म्हणाली, " ईश्वरासिद्धेः—प्रमाणाभावात्—"

निशी आणि प्रफुल्ल दोघीही बरोबरच शिक्षण घेत होत्या प्रफुल्लनें उत्तर दिलें, " सूत्रकारस्योभयेंद्रिय शून्यत्त्वात्—न तु प्रमाणाभावात्—"

दिवा म्हणाली, " राहूं दे तुमचं हें कात् खात् नी भात् ! कोणतीही वस्तु प्रत्यक्ष व्हायला साधन काय ? हें पहा, ही नदी, हें पाणी, झाडपाला, नक्षत्रं हीं सारीं कांहीं मला आपोआप दिसतात—"

" सारीं नव्हे !" प्रफुल्ल म्हणाली, " एक उदाहरण देतें. इंग्रजांचे शिपाई आज मला पकडायला येताहेत—होय ना ? ते तुला प्रत्यक्ष दिसतायत् का ?"

" नाहीं, पण आले कीं प्रत्यक्ष दिसतील."

' मीं म्हणतें, आले आहेत. पण कोणत्यातरी साधनाच्या मदतीशिवाय ते प्रत्यक्ष होत नाहींत—आतां हें पहा," असें म्हणून तिनें आपल्या हातची दुर्बीण दिवाकडे दिली आणि म्हटलें, " आतां काय दिसतंय् ? "

" एक लंबी होडी. त्यांत बरीचशीं माणसं आहेत." दिवा म्हणाली.

" आणखी काय दिसतंय् ? "

अशा पांच लंब्या होड्या, दिवा आणि निशी या दोघींनीं पाहिल्या.

निशीनें विचारलें, " या होड्या दिसताहेत चरापाशीं ! मग आमच्यापाशीं यायच्या ऐवजीं कांठाकडे कशाला राह्यल्या आहेत ? "

देवी म्हणाली " खुष्कीच्या मार्गानं येणारे शिपाई अजुन आले नसतील. त्यांची वाट बघतायत् ते ! ते शिपाई यायच्या पूर्वी होड्या चाल करून आल्या तर मी खुष्कीच्या मार्गानं पळून जाईन म्हणून ते पुढं येत नाहींत."

" पण आम्हांला तर ते दिसताहेत." दिवा म्हणाली, " मनांत आणलं तर आम्ही सहज पळून जाऊं."

" आमच्यापाशीं दुर्बीण आहे, हें त्यांना कुठं माहीत आहे ! " देवी म्हणाली.

निशी म्हणाली, " प्रफुल्लताई, जगलीवांचलीस तर आज ना उद्यां तुला नवऱ्याची भेट होईल. अजून खुष्कीच्या मार्गानं शिपाई आले नाहींत तोंवर पळून जाऊन बचाव करायला अवधि आहे. "

देवी म्हणाली, " जीव बचावायला जर मीं उतावीळ झालें असतें, तर सारं कांहीं कळून सवरून इथं कां आलें असतें ? अन् आल्यावर नौकेवरच्या साऱ्या लोकांना कां घालवून दिलं असतं ? आमच्या हजार बरकंदाजाना अगदीं दुसरीकडे कां पाठवून दिलं असतं ? "

दिवा म्हणाली, " आम्हांला हें आधीं कळलं असतं तर तुला आम्ही असं करूच दिलं नसतं. "

" काय टाप लागलीय तुमची ? " देवी म्हणाली, " आज माझे पति मला भेटणार ! त्यांची अनुमति घेऊन मीं हे प्राण त्यांच्या पायीं वाहाणार ! कळलं ? आतां ऐकून ठेव दिवा आणि निशी, माझे पति इथून निघून जातील त्यावेळीं तुम्ही दोघीही त्यांचेबरोबर निघून जा—अन् मग मला एकटीलाच पकडतील अन् मीं एकटी फांशीं जाईन ! म्हणूनच सर्वांना मीं घालवून दिलं ! आतां मला एवढीच भिक्षा घाला. माझ्या पतिराजाच्या बरोबर इथून पळून जा. "

" या देहांत प्राण असेपर्यंत आम्ही तुला सोडणार नाहीं. " निशी म्हणाली, " मरायचं असलं तर साऱ्या एकदम मरूं ! "

निशी दुर्बिणींतून पहात होती. ती म्हणाली, " ही पहा एक भानगड ! एक होडी येतेय. इंग्रजांचा हेर असावा हा ! "

निशीच्या हातची दुर्बीण घेऊन पाहून प्रफुल्ल म्हणाली, " हाच आहे तो सुयोग ! तेच येताहेत. तुम्ही आतां खालीं जा. "

दिवा आणि निशी तिथून उतरून खालीं केबिनींत गेल्या. होडी जवळ येऊं लागली. आंत व्रजेश्वर होता. एक उडी मारून तो नौकेवर चढला. होडी पलीकडे बांधून ठेवली गेली.

व्रजेश्वर येतांत प्रफुल्लनें उठून त्याला प्रणाम केला तेव्हां व्रजेश्वर म्हणाला, " आज पैसे आणतां आले नाहींत. अजून दोनचार दिवस लागतील. त्यावेळीं कुठं भेट घ्यायची तें मला कळलं पाहिजे. "

देवी म्हणाली, "आतां यापुढं माझी भेट व्हायची नाहीं—" बोलतांना तिचा गळा दाटून आला होता. डोळे पुसून घेऊन ती म्हणाली, "—यापुढं माझी भेट व्हायची नाहीं. कर्ज फेडायचा उपाय मीं सांगतें. ज्यावेळीं पैसे तुमच्या हातीं येतील तेव्हां ते गरीबदुबळ्यांना देऊन टाका म्हणजे माझ्या कर्जाची फेड होईल."

व्रजेश्वरनें देवीचा हात पकडला. तो म्हणाला, "प्रफुल्ल, तुझा पैसा—"

तोंडचे शब्द तोंडांतच राहिले. 'प्रफुल्ल' असें म्हणून व्रजेश्वरनें तिचा हात धरला तेव्हां तिच्या हृदयाचा बांध फुटला. डोळ्यांतून गंगायमुना पाझरूं लागल्या. पैशाची गोष्ट त्यांत वाहून गेली. तेजस्विनी देवीराणी पोरीसारखी रडूं लागली.

प्रफुल्ल उघडकीला आल्यावर व्रजेश्वरनें ठरवलें होतें, कीं तिला चांगली छेडायची, मनींच्या चार गोष्टी सांगायच्या, तिची पापकर्मे तिच्या पदरीं बांधून तिला कायमची रजा द्यायची. पण ज्यावेळीं तिच्या डोळ्यांतलीं आंसवें त्याच्या हातावर पडलीं त्यावेळीं आपलेही डोळे पुसून तो म्हणाला, "असं पहा प्रफुल्ल, तुझा पैसा तो माझा पैसा. त्याची फेड कसली करायची? पण मीं अगदीं आशेला आलों आहे. गेलीं दहा वर्षें सारखं तुझं चिंतन करतों आहें. आणखी दोघींशीं लग्न केलं पण माझी खरी पत्नी तूच असा निश्चय आहे माझा. कसं तुला समजावून सांगूं? हें बोलायचं नाहीं म्हणून म्हणत होतों, पण बोलल्यावांचून राहावत नाहीं. तूं मेलीस असं कळलं त्यावेळीं मीही मरायला निघालों होतो. तें माझं हरवलेलं माणिक आज मला मिळाल्यावर आतां मला स्वर्गाचीही पर्वा वाटली नसती—पण प्रफुल्ल, आज तुझ्या भेटीनं मला मर्मांतिक यातना होत आहेत—" एक आवंढा गिळून तो म्हणाला, "—मनाच्या मंदिरांत जी सोन्याची प्रतिमा मीं मांडली होती, ती माझी प्रफुल्ल—बोलवत नाहीं माझ्यानं—त्या माझ्या प्रफुल्लची हीच का वृत्ति?"

"म्हणजे मी डाकूगिरी करतें, हेंच ना?" प्रफुल्ल म्हणाली.

"नाहीं का तूं डाकूगिरी करीत?"

प्रफुल्लच्या सासऱ्यानें ती सासरीं गेल्यावेळीं तिला घराबाहेर घालवून द्यायला सांगितलें त्यावेळीं तिनें विचारलें होते, 'मी अन्नाला मोताद झालें आहें.

तुम्ही मला घालवून दिलं तर मी कसं माझं अन्न मिळवूं ?' त्यावेळीं तिच्या सासऱ्यानें उत्तर दिलें होतें, कीं 'चोरी कर, डाकूगिरी कर हवी तर !' प्रफुल्ल बुद्धिमती होती. तें उत्तर ती विसरली नव्हती. ती व्रजेश्वरला म्हणाली असती, " मी डाकू आहें म्हणून तुम्ही मला कां नांव ठेवतां ? मी वडिलांची आज्ञा पालन करतें आहें. त्यांनींच मला सांगितलं कीं चोरी कर, डाकूगिरी कर तुला अन्न हवं असलं तर !' पण तिनें तसें उत्तर दिलें नाहीं. नवऱ्या-समोर ती हात जोडून म्हणाली, " मी डाकू नाहीं. मी शपथेवर सांगतें, कीं मी दरोडे घातले नाहींत. दरोड्यांतील एक कवडीही मी कधीं घेतली नाहीं. मला लोक डाकू कां म्हणतात तेंच मला तुम्हांला सांगा-यचं आहे. ऐका—" असें म्हणून तिनें सासऱ्यानें तिला घालवून दिल्यापासून आजपर्यंतची सर्व हकिकत प्रांजलपणें त्याला निवेदन केली. शेवटीं ती म्हणाली, " माझ्या सांगण्यावर विश्वास आहे ना तुमचा ? "

अविश्वासाला जागाच नव्हती. ती हकिकत ऐकून व्रजेश्वरला जितका आनंद झाला होता तितकीच त्याला आपल्या कुटुंबियांबद्दल शरम वाटूं लागली होती. त्या असामान्य स्त्रीसमोर तो क्षणभर दबकून गेला होता. व्रजेश्वर जरी उत्तर देत नव्हता तरी त्याच्या मुद्रेकडे पाहून प्रफुल्ल म्हणाली, " आतां मला तुमची पायधूळ द्या आणि मला शेवटचा निरोप द्या. आतां इथं थांबूं नका. समोर विघ्न आहे. आज दहा वर्षांनीं तुमची भेट झाली तरीही मी तुम्हांला जायला सांगतें आहें, यावरूनच हें संकट किती मोठं आहे याची कल्पना करा. या नौकेंत माझ्या दोन सख्या आहेत—मोठ्या मायाळू आहेत त्या—लोभ आहे त्यांचा माझ्यावर—त्यांनाही बरोबर घेऊन जा—अन् त्या जिथं कुठं जाऊं इच्छित असतील तिथं त्यांना पाठवून द्या. अशीच माझी आठवण ठेवा आणि सागरला सांगा, कीं मला विसरूं नकोस."

व्रजेश्वर क्षणभर स्तब्ध बसला होता. नंतर तो म्हणाला, " मला कांहीं कळत नाहींसं झालंय प्रफुल्ल. हें काय चाललंय ? तुझे एवढे अनुचर आहेत त्यांतले कुणीच दिसत नाहींत कसे ? नौकेवर नावाडीसुद्धां नाहींत. अन् समोर संकट कसलं आलंय ? मला इथं राहूं नका असं कां म्हणतेयस ? ही शेवटची भेट असं कां म्हटलंस ? कसलं संकट आलंय ? "

" तें तुम्हाला सांगतां येत नाहीं. " प्रफुल्ल म्हणाली.

" तर मग मी तुझा कुणीच नाहीं का ? " व्रजेश्वरनें विचारलें.

त्याचवेळीं ठो करून बंदुकीचा आवाज झाला.

— २ —

बंदुकींचा आवाज होताच व्रजेश्वरचें भाषण तसेंच राहून गेलें. दोघांनींही समोर पाहिलें.—दुरून पांच लंब्या होड्या येत होत्या. वल्ह्यांच्या तडाख्यानें पाणी चांदण्यांत चमकत होतें. पांचही होड्यांत शिपाई होते. खुष्कीच्या मार्गानें शिपाई येऊन पोंचल्यामुळें त्यांनीं संकेतासाठीं बंदुकीचा बार केला तेव्हां ह्या होड्या चालू झाल्या होत्या. प्रफुल्ल म्हणाली, " आतां क्षणभरसुद्धां वेळ लावूं नका. आपल्या होडींत उतरून जा पाहूं ! "

व्रजेश्वर म्हणाला, " कुणाच्या ह्या होड्या ? हा बंदुकीचा बार कसला ? तुला कांहीतरी माहित असावंसं दिसतंय. तें ऐकल्याशिवाय मी जाणार नाहीं. "

" ते कंपनीचे शिपाई आहेत. "

" तुला पकडायला का आले आहेत ? " व्रजेश्वरनें विचारलें.

प्रफुल्ल कांहीं बोलली नाहीं तेव्हां व्रजेश्वरनें पुन्हां विचारलें, " तुला हें आधींच माहित असावंसं दिसतं—होय ना ? "

" माझे हेर सर्वत्र फिरत असतात. या घाटावर यायच्या पूर्वीच मला सारं कांहीं कळलं होतं. "

" मग कळून सवरून या संकटांत उडी कां घेतलीस ? "

" तुम्हांला एकदां भेटण्यासाठीं. "

" तुझी माणसं कुठं आहेत ? "

" त्यांना मी निरोप दिला. माझ्यासाठीं त्यांनीं कां मरावं ? "

" म्हणजे पकडून द्यायची तूं तयारीच केली होतीस म्हणायची ! "

प्रफुल्ल म्हणाली, " आतां जगून काय करायचं ? तुमची भेट झाली, मनांतल्या गोष्टी मी तुम्हाला सांगितल्या, तुमचं माझ्यावर प्रेम आहे हेंही मला कळून चुकलं, माझी जी कांहीं संपत्ति होती ती मी सर्वांना वांटून टाकून मोकळी झालेंय. आतां कशाला जगायचं ? "

" माझ्या घरीं माझी गृहिणी म्हणून येण्यासाठीं. मी शपथेवर सांगतोय, कीं आज जर तूं स्वतःला पकडून दिलं नाहींस तर मी तुला माझी गृहिणी म्हणून घरीं घेऊन जाईन."

" माझे सासरे काय म्हणतील ?"

" त्याचं काय तें मी पाहून घेईन. त्याची काळजी नको."

एक सुस्कारा सोडून प्रफुल्ल म्हणाली, " काल हें कळलं असतं तर ?"

" काल कळलं असतं तर काय झालं असतं ?"

" तर काय कुणाची छाती होती आम्हाला पकडायची !" प्रफुल्ल म्हणाली, " तुमची होडी बोलावा. निशी दिवाला घेऊन लवकर इथून निघून जा."

व्रजेश्वरनें होडीवाल्याला बोलावून म्हटलें, " होडी जलदी हांकारून तुम्ही इथून निघून जा. कंपनीचे शिपाई येताहेत. ते तुम्हाला पकडतील."

होडीवाल्यांनीं आज्ञा पाळली. ते होडी सोडून तिथून चटकन् गेले असें पाहून प्रफुल्लनें व्रजेश्वरला विचारलें, " तुम्ही गेलां नाहीं ?"

" कां ! तुला जिवावर उदार होतां येतं आणि मी काय भेकड आहें ?" व्रजेश्वर म्हणाला, " तूं माझी पत्नी—शंभर वेळ मी तुला टाकली असली तरी मी तुझा नवराच—संकटांत तुझा रक्षणकर्ता. तूं संकटांत असतांना तुला टाकून कसा जाऊं ?"

" तर मग ऐका" प्रफुल्ल म्हणाली, " उपाय गवसला तर मीही आतां जीव देणार नाहीं—" तिनें आकाशाकडे पाहिलें. तिथें तिला जें काय दिसलें त्यावरून तिला धीर आला. अवसान येऊन ती म्हणाली, " पण एक अडचण आहे. तुम्हाला सांगूं नये असं मी ठरवलं होतं पण आतां गत्यंतर नाहीं. या शिपायांबरोबर माझे सासरे आहेत. मी पकडली गेलें नाहीं तर ते संकटांत येतील."

व्रजेश्वर शहारला. त्यानें कपाळावर हात मारून घेतला. तो म्हणाला, " तेच का हे फितुरी ?"

प्रफुल्ल उगीच राहिली. व्रजेश्वरच्या डोळ्यासमोर आतां चक्क प्रकाश पडला. कर्जफेडीची कोणत्याही प्रकारची आतुरता न दाखवतां हरवल्लभ कां निघून गेला तें त्याला आतां उमजलें. तो प्रफुल्लला म्हणाला, " मी मेलों तरी हरकत

नाहीं. तुझा आणि माझा बचाव करायच्या आधीं मला माझ्या बापाला बचावलं पाहिजे."

"त्याची काळजी नको." प्रफुल्ल म्हणाली, "त्यांना कांहीं भीति नाहीं. आतां तुम्हीच स्वतःचं रक्षण करा. मी मुकाट्यानं स्वतःला पकडून घेणार आहें. यत्किंचितही बचावाचा प्रयत्न करणार नाहीं. तुम्ही निश्चिंत रहा."

निष्काम कर्माचें तत्त्व प्रफुल्लच्या हृदयांत पूर्णपणें बिंबलें होतें.

तितक्यांत नदीच्या कांठावरून दुरून तुतारीचा आवाज ऐकूं आला. दोघेंही दचकलीं. देवीनें हांक मारून निशीला विचारलें तेव्हां ती म्हणाली, "ही रंगराजाची तुतारी."

देवी म्हणाली, "असं कसं होईल? मी आज सकाळींच त्याला देवीगडला पाठवलं होतं!"

निशी म्हणाली, "मला वाटतं ते अर्ध्या वाटेंतूनच मागें फिरले."

देवी म्हणाली, "रंगराजला हांक मार."

"तुतारीचा आवाज आला फार दुरून." व्रजेश्वर म्हणाला, "इथून हांक मारून त्याच्या कानीं कशी जाईल? हवं तर मी जाऊन त्याला—"

"कांहीं जरूर नाहीं." देवी म्हणाली, "तुम्ही खालीं जा आणि निशीचं कसब पाहा."

निशी आणि व्रज खालीं गेलीं. निशीनें बांसरी काढली आणि मल्हार राग छेडायला सुरवात केली. थोड्याच वेळांत रंगराज नौकेवर चढला. व्रजेश्वर निशीला म्हणाला, "तूं वर जा. आणि सारं कांहीं ऐकून घेऊन मला येऊन सांग. मी गेलों तर त्यांना संकोच वाटेल."

निशी निघून गेली आणि थोड्याच वेळांत परत येऊन म्हणाली, "जरा बाहेर पहा डोकावून."

व्रजेश्वरनें पाहिलें, तों जंगलांतून असंख्य लोक बाहेर येत होते. त्यानें विचारलें, "हें कंपनीचे शिपाई का?"

"हे बरकंदाज आहेत आमचे." निशी म्हणाली, "रंगराज घेऊन आलाय."

ती बरकंदाजांची टोळधाड येत असलेली पाहून देवीनें रंगराजला विचारलें, "तूं इथं का? सकाळींच मी तुला देवीगडला पाठवलं होतं ना? माझा हुकुम कां मोडला?"

" मी देवीगडला जात होतों, " रंगराज म्हणाला, " वाटेंत ठाकूरजी भेटले, त्यांनीं सांगितलं कीं कंपनीचे शिपाई तुम्हांला पकडायला निघाले आहेत. मी बरकंदाज गोळा करून जंगलांत लपून बसलों. शिपाई आलेले पाहतांच त्यांना आम्ही वेढा दिला. भवानी ठाकूर बरकंदाजांना घेऊन बाहेर राहिले आहेत. शिपाई आहेत पांचशें पण आमचे बरकंदाज आहेत सुमारें हजार. "

देवीनें विचारलें, " लढाई झाली तर या पंधराशें लोकांतले किती लोक मरतील ? "

रंगराज म्हणाला, " दोनचारशें तर सहज मरतील. "

देवी म्हणाली, " ठाकुरजींना जाऊन सांग, कीं तुमच्या कृतीमुळें मला मरणांतिक दुःख झालंय. एका बायको माणसाच्या पायीं एवढ्या लोकांना मारायची तयारी करतांना तुमचं धर्मज्ञान कुठं गेलं होतं ? माझं आयुष्य भरलं असेल तर मरेन. माझ्यापायीं दोनचारशें लोकांनीं काय म्हणून मरावं ? एवढ्या लोकांना मारून स्वतःचा बचाव करण्याइतकी मी निर्घृण आहें असं का तुम्हाला वाटलं—? " रंगराज मान खालीं घालून ओशाळून उभा होता. देवी त्याला उद्देशून कडाडत्या आवाजात म्हणाली, "—ऐक रंगराज, ठाकूरजींना म्हणावं, याच क्षणीं सारे बरकंदाज घेऊन मागें फिरा. एक क्षणाचा विलंब लावलात तर मी पाण्यांत उडी घेऊन जीव देईन. "

रंगराज एवढासा होऊन गेला. तो म्हणाला, " मी जातों अन् ठाकूरजींना सांगतों. त्यांना जें योग्य वाटेल तें ते करतील. मी दोघांच्याही हुकुमांचा ताबेदार आहें ! "

निशी आडून ऐकत होती. रंगराज निघून गेल्यावर ती देवीपाशीं आली आणि म्हणाली, " स्वतःच्या जिवाशीं खेळ खेळायला तुझी तूं मुखत्यार आहेस. पण आज तुझा पती इथं आहे त्याचं काय करायचं ठरवलं आहेस ? "

"त्याचाही विचार केलाय मी. " देवी म्हणाली, " आतां माझा भार ईश्वरावर. जें व्हायचं असेल तें होईल—पण माझ्या पतीचा बचाव करण्यासाठीं मी एवढ्या लोकांचे प्राण कां खर्ची घालूं ? माझा पति मला मोठा असेल, पण त्या लोकांना त्याचं काय ? "

निशीनें जाऊन ही सर्व हकिकत व्रजेश्वरला सांगितली त्यावेळीं त्याला वाटलें, कीं अशा असामान्य स्त्रीला मी आपली पत्नी कशी म्हणूं ? खरोखरच

ही एक देवी आहे. मी नराधम आहें. हिला डाकू म्हणून मी तिची निर्भर्त्सना केली—केवढा पापी मी ! '

इतक्यांत चोंहो बाजूनी येऊन त्या होड्यांनीं नौका घेरली. प्रफुल्लनें तिकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. ती दगडाच्या पुतळीसारखी निश्चल बसून राहिली होती. ती त्या शिपायांच्या होड्या पहात नव्हती. तिची दृष्टी दूर आकाशावर खिळली होती. केव्हांपासून एक छोटासा ढग आकाशांत तळपत होता. आतां तो बराचसा मोठा वाढला असें पाहतांच 'जय जगदीश्वर' असें म्हणून प्रफुल्ल खालीं उतरली.

निशीनें तिला विचारलें तेव्हां ती म्हणाली, "आतां माझ्या पतीला वाचवलं पाहिजे."

"अन् तुझं काय ?"

"माझं कांहीं विचारूं नकोस." देवी म्हणाली, "मी जें कांहीं सांगतें आहें, करतें आहें, त्याच्याकडे नीट अवधान दे. तुझ्यामाझ्या नशिबीं काय असेल तसं होईल, पण मला माझ्या पतीचा बचाव केला पाहिजे, दिवाचा बचाव केला पाहिजे, मासऱ्याचा बचाव केला पाहिजे !" असें म्हणून देवीनें हातीं शंख घेऊन तो फुंकला.

निशी म्हणाली, "फार बरं !"

देवी म्हणाली, "बरं वाईटाचा आतां विचार नको. आतां जें कांहीं करायचं तें तुला समजावून सांगतें. आतां सारा भरिभार तुझ्यावर आहे."

— ३ —

तिस्रोता नदीच्या कांठावरून बरकंदाजांची फौज वारुळांतल्या मुंग्यासारखी बाहेर पडूं लागली. ते सर्व शिपाई सशस्त्र होते.

आतां होड्या नौकेला वेढा घालणार असें दिसून येतांच बरकंदाज 'राणीजी की जय' म्हणून आरोळी ठोकीत पुढें सरसावले. त्यांनीं आधीं नौकेला वेढा दिला. त्यांतले कांहीं नौकेवर चढले. कुणी सुकाणु धरलें, कुणी शिडाच्या दोऱ्या धरल्या, कुणी वल्हीं हातीं घेतलीं—प्रत्येकजण आपापल्या जागीं हजर झाला. बरेचसे बरकंदाज नौकेवर चढले होते आणि तीनचारशें कांठावर राहिले होते. काठावरून ते इंग्रजांच्या होड्यांवर मारा करीत होते. होड्या-वरचे शिपाईही बंदूक संगीन सरसावून चढाव करूं लागले होते.

सर्वत्र लढाई सुरू झाली. मारामारी, काटाकाटी, आरडाओरडा, गोळीबार, लाठीची धडक या सर्वांच्या हलकल्लोळांत कुणालाच कांहींच कळत नाहींसें झालें होतें.

दुरून लढाई झाली तर शिपायांच्यासमोर लाठीबाजांचें कांहीं चालत नाहीं, पण शिपाई होडींत अडकून पडल्यामुळें त्यांची तिरपीट उडाली. किनाऱ्यावरच्या बरकंदाजांना शिपायांनीं हटवलें पण पाण्यांत चाललेल्या लढाईंत त्यांनीं शिपायांची टाळकीं शेकून काढलीं.

प्रफुल्ल खालीं आल्यानंतर थोड्याच वेळांत हा प्रकार सुरू झाला होता. प्रफुल्लला वाटलें, आपला निरोप भवानी ठाकूरपर्यंत एक पोहोंचला तरी नाहीं, किंवा त्यांनीं आपलें सांगणें ऐकलें तरी नाहीं.

या राणीगिरींत देवीच्या अंगीं कांहीं नवीन गुणांचा प्रादुर्भाव झाला होता. त्यांतला एक हा, कीं ज्या वस्तूचा कोणत्याही प्रकारें उपयोग होणें इष्ट असेल त्या वस्तु गोळा करून आधीं हातापाशीं ठेवायच्या. या तिच्या सावधगिरीचा परिचय वारंवार मिळाला होता. देवीला यावेळीं हातापाशीं मिळालें तें पांढरें निशाण. तिनें तें हातीं घेतलें आणि वर उचावून धरलें.

तें निशाण पाहतांच लढाई एकदम बंद पडली. जो ज्या जागीं होता त्या जागीं तो स्तब्ध उभा राहिला. उठलेली वावटळ जणुं काय एकदम शांत झाली. उफाळलेला समुद्र जणुं काय एकदम सरोवर बनून गेला.

देवीनें पाहिलें, व्रजेश्वर जवळच उभा होता. लढाई सुरू होतांच देवी बाहेर आलेली पाहतांच तो तिच्या मागोमाग आला होता. देवी त्याला म्हणाली, "तुम्ही हें निशाण असंच धरून ठेवा. मी आंत जाऊन निशी आणि दिवा यांना जें काय सांगायचं तें सांगून येतें. रंगराज आला तर त्याला सांगा, कीं दरवाजाबाहेरून माझे हुकुम ऐकून घ्या."

व्रजेश्वर निशाण उभारून उभा होता. तितक्यांत रंगराज तिथें आला. व्रजेश्वरच्या हातांत पांढरें निशाण पाहून त्यानें विचारलें, "कुणाच्या हुकुमानं हें पांढरं निशाण दाखवतांहां?"

व्रजेश्वर म्हणाला, "राणीजींचा हुकूम. मला ओळखलं नाहीं?"

क्षणभर त्याच्याकडे निरखून पाहून रंगराज म्हणाला, "ओळखलं. व्रजेश्वरबाबू ना तुम्ही? काय चाललंय हें? बापबेट्यांचं हेंच का कारस्थान? याला बांधा रे कुणी."

हरवल्लभाप्रमाणेंच व्रजेश्वरही देवीला पकडून देण्यासाठीं नौकेवर आला असावा असें वाटून रंगराजनें आपल्या माणसाकरवीं त्याला बांधलें. तो म्हणाला, "कांहीं हरकत नाहीं.—खुशाल मला बांधा. पण मला असं सांगा, पांढरं निशाण दाखवतांच दोन्हीही पक्षांनीं लढाई कां थांबवली ?"

"अगदीं पोर आहेस तूं !" रंगराज म्हणाला, "पांढरं निशाण दाखवलं कीं इंग्रज लढत नाहींत तें माहित नाहीं का तुला ?"

"तें मला माहित नाहीं." व्रजेश्वर म्हणाला, "राणीजींच्या हुकुमानं मी हें निशाण दाखवीत होतों. हवं तर तुम्ही त्यांना विचारा. दरवाजा बाहेरूनच तुम्ही हुक़ूम घ्यायचे असा राणीजींचा हुकूम आहे."

दरवाजापाशीं जाऊन रंगराजनें विचारलें तेव्हां आंतून उत्तर आलें, "तो माझाच हुकूम होता. हें पांढरं निशाण घेऊन तूं लेफ्टनंट साहेबाकडे जा. त्यांना म्हणावं, लढायचं कारण नाहीं. मी स्वाधीन होतें."

रंगराज म्हणाला, "माझ्या कुडींत प्राण असेपर्यंत हें होणं नाहीं."

देवी म्हणाली, "उगीच वेडेपणा करूं नकोस. शिपायांच्या बंदुकीसमोर आपल्या लाठ्याकाठ्या टिकायच्या नाहींत. यापुढं रक्ताचा एक थेंब पडला तर मी साहेबाच्या गोळीबाराला तोंड देईन. मी स्वाधीन झालें तर पळून जायला वाव आहे. सध्यां सर्वांचे प्राण बचावून मला बंधमुक्त करायची युक्ति योजा. कंपनीचे शिपाई लांचखाऊ आहेत. त्याना पैसे चारून हें काम करा."

लांच देऊन पळायची कल्पना देवीच्या मनांत त्यावेळीं मुळींच नव्हती. ती रंगराजाला झुलवीत होती. अगदीं सरळ सरळ इंग्रजांच्या स्वाधीन व्हावें असें तिनें ठरवलें होतें. मात्र यावेळीं आपला पति, सासरा आणि मैत्रिणी यांची सुटका करायची योजना तिनें करून ठेवली होती.

रंगराज म्हणाला, "कंपनीच्या लोकांना पैसे द्यायचे म्हटलं तर खजिन आहे नौकेवर. तुम्ही स्वाधीन झालां तर इंग्रज नौका काबीज करतील."

"तसं करूं द्यायचं नाहीं त्यांना !" देवी म्हणाली, "त्यांना म्हणावं, मी स्वाधीन होईन पण नौका मिळायची नाहीं—नौका आणि नौकेवरचीं माणसं सोडून देणार असाल तरच मी स्वाधीन होईन असं त्यांना सांगा."

"आणि इंग्रजांनीं तें एकलं नाहीं तर ? नौका लुटायला लागले तर ?"

"त्यांना मना करा." देवी म्हणाली, "त्यांना म्हणावं नौकेला हात लावलात तर इंग्रज संकटांत येतील. नौकेवर चढून आलांत तर मी स्वाधीन होणार नाहीं. इंग्रज नौकेवर चढून आला तर त्याचक्षणीं युद्ध सुरू होईल. या अटी त्यांनीं मान्य केल्या तर मी आपणहून त्यांच्या होडीवर जाईन."

देवीचें हें कांहींतरी कारस्थान आहे याची रंगराजला कल्पना आली. त्यानें कबुली दिली तेव्हां देवीनें विचारलें, "ठाकुर कुठं आहेत?"

"ते लढाईत गुंतले आहेत, आमचं त्यांनी ऐकलं नाहीं. अजून ते तिथंच असावेत." रंगराज म्हणाला.

"तर मग आधीं त्यांच्याकडे जा." देवी म्हणाली, "साऱ्या बरकंदाजांना म्हणावं तुम्ही कांठावर जा. नौकेवर आले आहेत तेवढे तिथंच राहूं देत. ते नाहीं म्हणाले तर त्यांना आकाशाकडे पाहायला सांग—त्यांना तें कळेल."

रंगराजनें स्वतः आकाशाकडे पाहिलें—वर आकाशांत वैशाखी ढग दाट गोळा झाले होते.

हरवल्लभरायनें ही चुगली केली असून त्याचा मुलगा व्रजेश्वर नौकेवर आहे, तेव्हां त्यालाही बांधून ठेवावें असें रंगराज म्हणाला तेव्हां देवीनें सांगितलें, "त्याला बांधू नका. त्याला म्हणावं वर जाऊन लपून बैस. दिवा सांगेल तेव्हां खालीं ये."

रंगराजनें सांगितल्याप्रमाणें केलें. सारे बरकंदाज नदीकांठीं निघून गेले. सिंध साधून दिवा आणि निशी बाहेर आल्या आणि त्यांनीं बरकंदाजवेषी नावाड्यांना गुपचुप कांहीं कामगिरी सांगितली.

रंगराज पांढरें निशाण हातीं घेऊन पाण्यांत उतरून साहेबाच्या होडीवर गेला. त्यानें देवीचा निरोप त्याला सांगितला तेव्हां साहेब म्हणाला, "आम्हाला सर्वांनाच पकडायचं आहे, एकट्या देवीलाच नव्हे. हे सारे बरकंदाज डाकू आहेत. सरकारचे दुष्मन आहेत."

रंगराज म्हणाला, "आतां ते लढणार नाहींत. ते पहा, ते निघून जात आहेत."

देवीची फौज पळून जाते आहे असें पाहून साहेब ओरडून म्हणाला, "पांढरं निशाण दाखवायचं सोंग करून सुटून जाऊं पहातां का?"

" सुटून जायला पकडलंय कुणाला ? " रंगराज म्हणाला, " असली ताकद तर पकडा त्यांना. मी हें निशाण फेंकून देतों. "

साहेबाला वाटलें, त्यांचा पाठलाग करायचा कसा ? पाहतां पाहतां ते जंगलांत शिरून नापत्ता होतील. ती रात्रीची वेळ, आकाश भरून आलेलें, हें घनदाट जंगल—आपल्या शिपायांना रस्ता माहित नाहीं, बरकंदाज रस्त्याचे माहितगार, तेव्हां या भानगडींत पडण्यांत अर्थ नाहीं असें समजून साहेब म्हणाला, " जाऊं दे त्यांना. आतां तुम्ही सारे स्वाधीन होतां ना ? "

रंगराज म्हणाला, " मुळीच नाहीं. फक्त देवी चौधुराणी. "

साहेब म्हणाला, " तुमचे बरकंदाज पळून गेले. आतां आमच्या पांचशें शिपायांबरोबर लढणार कोण ? "

रंगराज म्हणाला, " तें मला माहीत नाहीं. माझ्या धन्यांनीं सांगितलं तें मी तुम्हाला सांगितलं. तुम्हाला नौका मिळायची नाहीं. नौकेवरची चीजवस्तु मिळायची नाहीं. आमच्यापैकीं कुणीही मिळायच नाहीं—फक्त देवीराणी तुमच्या स्वाधीन होईल. "

साहेब म्हणाला, " आतां नौका आमची आहे. आम्ही ती ताब्यांत घेऊं. "

रंगराज म्हणाला, " साहेब, माझं ऐका. नौकेवर जाऊं नका. संकटांत सांपडाल. "

साहेब म्हणाला, " माझ्या पांचशें शिपायांबरोबर तुमच्या चार दोन माणसांना काय करतां येणार आहे ? " असें म्हणून त्यानें नौकेला वेढा देण्याबद्दल शिपायांना हुकूम केला.

पांच छिद्रमधून शिपायांनीं नौका वेढली. साहेब म्हणाला, " नौकेवर चढा आणि वरच्या लोकांच्या हातातील हत्यारें काढून घ्या. "

साहेबानें हा हुकूम मोठ्यानें ओरडून दिला होता. तो देवीच्या कानीं गेला. तिनेंही तितक्याच जोरानें ओरडून म्हटलं, " नौकेवरच्या प्रत्येक माणसानं आपल्या हातांतील हत्यारं पाण्यांत फेकून द्यावीं."

रंगराजसकट सर्वजणांनीं हत्यारें फेकून दिलीं. साहेब खूष होऊन म्हणाला, " चला आतां नौकेवर काय आहे तें पाहूं. "

रंगराज म्हणाला, " साहेब, माझं न ऐकतां तुम्ही नौकेवर जातांहां. तसं कांहीं झालं तर मला दोष देऊं नका. "

एक शिपाई बरोबर घेऊन सशस्त्र साहेब नौकेवर गेला. सर्वत्रांनीं शस्त्रें फेंकून दिल्यामुळें तो निर्धास्त झाला होता, पण देवीपाशीं अचाट बुद्धीचें धारदार अस्त्र होतें तें त्याला माहीत नव्हतें.

साहेब रंगराजबरोबर केबिनच्या दाराशीं आला. दार उघडलें गेलें आणि तो आंत गेला. व्रजेश्वर पहिल्यानें या जागीं आला त्यावेळीं जसा हा दिवाणखाना श्रृंगारलेला होता तसाच तो यावेळींही दिसत होता. फरक एवढाच होता, कीं मसनदीवर एकाच्या ऐवजीं दोन स्त्रिया बसल्या होत्या. रंगराजनें त्यांना ओळखलें—एक होती दिवा आणि एक होती निशी. रंगराज इकडे तिकडे पाहूं लागला. तिथेंच एका कोंपऱ्याला अगदीं साधा पोशाख करून देवी उभी होती.

साहेबानें विचारलें, "कुठं आहे देवी चौधुराणी? कुणाबरोबर बोलणं करायचं?"

निशी म्हणाली, "माझ्याबरोबर! मी देवी"

दिवा हंसली आणि म्हणाली, "इंग्रज दिसला म्हणून ढोंग करते आहेस होय? ही माझी बहिण मोठी थट्टेखोर आहे लेफ्टनंटसाहेब. तुम्ही माझ्याशीं बोला. मी देवी चौधुराणी."

निशी म्हणाली, "माझ्यासाठीं तूं कां फांशीं जातेस? ऐकलंत साहेब, ही माझी बहिण माझा बचाव करण्यासाठीं खोटंच बोलते आहे. तिचं ऐकूं नका. मलाच घेऊन चला. मीच देवी चौधुराणी."

दिवा म्हणाली, "तुम्हाला येशूखिस्ताची शपथ आहे साहेब. या निरपराधी स्त्रीला घेऊन जाऊं नका. देवी ती मी."

साहेब घोटाळ्यांत पडला. त्यानें रंगराजला विचारलें. रंगराजलाही कांहीं कल्पना नव्हती. पण थोडीशी अक्कल खर्ची घालून निशीकड बोट करून तो म्हणाला, "हुजुर हीच खरी देवी राणी."

आतां देवी पुढें सरसावली आणि म्हणाली, "आतां बोलल्यावांचून गत्यंतर नाहीं. मी सांगतें. या सांगताहेत तें सारं खोटं—" निशीकडे बोट करून म्हणाली, "—ही तर देवी नव्हेच नव्हे. ही देवीला माँ म्हणते. तिचा बचाव करण्यासाठीं ही खोटं बोलते आहे."

साहेब म्हणाला, "तर मग देवी कोण?"

देवी म्हणाली, "मी देवी."

आणि मग एकच गोंधळ उडाला; निशी म्हणत होती "मी देवी." दिवा म्हणत होती 'मी देवी.' रंगराज निशीला दाखवून म्हणत होता, 'हीच देवी.' आणि देवी म्हणत होती, 'मीच देवी.' साराच ब्रह्मघोटाळा !

साहेब घोटाळ्यात पडला. तो म्हणाला, "तुम्हां दोघींपैकीं एकजण देवी चौधुराणी आहे खास. ती आहे नोकराणी—ती कांहीं देवी नव्हे. तुम्हा दोघी-पैकीं कोण देवी तें ज्याअर्थी तुम्ही सांगत नाहीं, त्याअर्थी मी दोघींनाही पकडून नेणार. आणि या दोघीपैकीं कुणीही कबुली दिली नाहीं तर दोघीं-नाही फांशी देणार."

साहेबाचें तें भाषण ऐकून दिवा आणि निशी म्हणाल्या, "कशाला ही भानगड ? आपल्याकडे ज्या कुणी ही वर्दी दिली त्यालाच बोलावा आणि खरी देवी ओळखून घ्या."

कांहींतरी करून हरवल्लभचा बचाव केल्याशिवाय आपण निसटून जायचें नाहीं असें तिनें ठरवलें होतें.

ती योजना साहेबालाही पटली आणि त्यानें हरवल्लभला आणायचा हुकूम सोडला.

— ४ —

हरवल्लभ या युद्धक्षेत्रांत हजर होता पण तो स्वेच्छेनें नव्हे. सावधगिरी बाळगून तो शिपायांच्या छिपत्रर चढला नव्हता. एका लहानशा होडींत बसून त्यानें साहेबाला देवीची नौका दाखवली आणि त्या होडींतून तो तसाच अर्धा कोस दूर निघून गेला.

वर वादळाचीं लक्षणें दिसत होतीं. बक्षिसाच्या लोभानें तो आला होता, पण आतां त्याची हबेलंडी उडाली होती. वादळ उठलें असतें तर त्याची होडी पहातां पहातां बुडाली असती. कुठली झक मारली असें वाटून तो रडकुंडीला आला.

इतक्यांत एकदम बंदुकीचे बार ऐकूं आले. आरडाओरडा ऐकूं आला आणि तो लगेच बंद पडला. शिपायांचा जय होऊन ती बेटी पकडली गेली असावी असें हरवल्लभला वाटलें. त्याला धीर आला. तो युद्धस्थानावर जायला निघाला. तिथून एक होडीवाला जात होता. त्याला बोलावून तो त्याच्या होडींत

चढला. होडीवाला जायला घाबरत होता पण हरवल्लभला परवलीचा शब्द माहित होता. अर्थात शिपायानें त्यांना जाऊं दिलें.

तिनक्यांत त्याला शोधीत शिपाई आले. कप्तानसाहेबांनीं बोलावलें आहे असें सांगून ते त्याला नौकेपाशीं घेऊन गेले.

हरवल्लभ आला आहे असें पाहतांच देवी म्हणाली, " कप्तानसाहेबांच्या न्याहारीची व्यवस्था करतें. " असें म्हणून ती गेली आणि हरवल्लभ आंत आला. तिथलें वैभव पाहून तो दिपून गेला होता. घाबरून जाऊन साहेबाला सलाम करायच्याऐवजा त्यानें दागदागिने घालून मसनदीवर बसलेल्या निशीलाच सलाम केला. निशी हंसून म्हणाली, " बंदगी खांसाहेब. मिजाज् शरीफ् ? "

दिवा म्हणाली, " बंदगी खांसाहेब ! मला कुर्निसात केला नाहीं तुम्ही. मी राणी आहें यांची. "

साहेब हरवल्लभला म्हणाला, " या दोघीही म्हणताहेत कीं आपण राणी म्हणून. आतां तुम्हीच सांगा, यांतली खरी राणी कोण ? "

हरवल्लभाला मोठा पेंच पडला. खरी राणी कोण हें त्यानेंच काय, पण त्याच्या बापदाद्यानींही पाहिलें नव्हतें. अंदाजानें त्यानें निशीकडे बोट केलें. निशी खुदखुदुन हसूं लागली, " चुकलं हं ! " असें म्हणून हरवल्लभनें दिवाकडे बोट केलें. दिवा खदखदून हसूं लागली तेव्हां हरवल्लभनें पुन्हां निशीला दाखवून दिलें. साहेब चिडून ओरडला, " टूम शुवर ! बडमाष ! टुम पैछानटे नहीं ! "

तें ऐकून दिवा म्हणाली, "रागावूं नका साहेब. ते ओळखत नाहींत देवीला. त्यांचा मुलगा ओळखतो. तो धाब्यावर आहे. त्याला घेऊन या. "

व्रजेश्वर तिथेंच आहे हें ऐकून हरवल्लभचा जीव भांड्यांत पडला. तो इथें कां आला हा प्रश्न त्याच्यासमोर उभा होता, तरीही त्याच्यामुळें आपण या पेंचांतून मोकळे होऊं असें त्याला वाटलें.

दिवानें हुकूम दिल्यावरून रंगराज जाऊन व्रजेश्वरला घेऊन आला. तो येतांच साहेबानें विचारलें, " तूं देवी चौधुराणीला ओळखतोस ? ती आहे का इथें ? " व्रजेश्वर नाहीं म्हणाला तेव्हां साहेब रागानें भडकून ओरडला, " या दोघींपकीं एकही देवी नव्हे ? तूं देवीला ओळखतोस ? "

व्रजेश्वर म्हणाला, " हो, ओळखतों. या दोघी तिच्या दासी आहेत."

साहेब म्हणाला, " तर मग ती नोकराणीच देवी असली पाहिजे. चल, आपण तिला शोधून काढूं. तूं ओळख पटव."

व्रजेश्वर म्हणाला, " हवी तर तुम्हीच काढा तिला ओळखून. मी कांहींसुद्धां सांगणार नाहीं."

साहेब पुन्हां ओरडला, " क्यौं बे बज्जाद, तुम गोयन्दा नहीं ? "

" नाहीं ! " असें म्हणून व्रजेश्वरनें साहेबाच्या गालावर एक शंभर टक्के चपराक लगावली.

" हें काय ? हें काय ? घात केलास पोरा ! " असें म्हणून हरवल्लभ टाहो फोडून रडूं लागला.

" हुजूर ! तुफान उठा—तुफान उठा ! " असें म्हणून जमादार ओरडला.

आकाशांत सों सों करीत जोरानें वादळ उठलें. त्याचवेळीं व्रजेश्वरनें साहेबाच्या गालांत थप्पड दिली—त्याचवेळीं बाहेर शंखाचा आवाज झाला. नौकेचा नांगर सोडलेला नव्हता. कांठावर दोरीनें नौका खुंटीला बांधलेली होती. शंख वाजतांच कांठावरच्या नावाड्यांनीं खुंटीची दोरी सोडून दिली. त्यासरशीं नौका सळाळत चालूं झाली. कांठावरचे शिपाई बंदूक घेऊन नावाड्यांच्या मागें धांवत होते तोंच नौका पहातां पहातां दूर निघून गेली. पांचशें शिपाई कांहींसुद्धां न करतां पराभव पावले.

नौकेचीं चारही शिडें पूर्वीपासूनच उभारलेलीं होती. शंख वाजतांच नावाड्यांनीं घोस खेंचला आणि शिडांत वारा भरला. वादळी वावटळीबरोबर नौकेनें एक चक्कर घेतली आणि लगेच नौका तीराच्या वेगानें पहातां पहातां दूर निघून गेली. व्रजेश्वरला उलट धक्का देण्यासाठीं साहेब उभा रहात होता तो नौकेच्या भिंगरीबरोबर कोलमडून दिवाच्या पायाशीं पडला. व्रजेश्वर त्याच्या छातीवर बसला. रंगराजही हजर होताच. हरवल्लभही तसाच कोसळून पडला होता. त्याला वाटलें, नौका बुडाली. आतां देवाचें नांव तरी कशाला घ्यायचें ?

पण नौका बुडाली नव्हती. एकदां पलटा खाऊन ती झपाट्यासरशीं चालू झाली होती. खालीं पडलेलीं माणसें पुन्हा सांवरून उभीं राहिलीं. पाण्यांत असलेल्या साहेबाच्या फौजेला धडक मारून नौका पुढें गेली होती. त्या धडाक्यानें कित्येक बुडून मेले. नौकेखालीं सांपडून साहेबाच्या पांचही छिपा बुडून गेल्या

नक्षत्रवेगानें नौका कुठें गेली तें कुणाला कळलेंही नाहीं. शिपायांचें सैन्य उध्वस्त झालें होतें आणि लेफ्टनंटसाहेब आणि हरवल्लभदास देवीचे कैदी झाले होते.

वादळाच्या जोरासरशी नौका लाटांबरोबर नाचत खेळत नक्षत्रवेगानें सुटली होती. चोंहीकडून वादळाचे भयंकर आवाज ऐकूं येत होते. ती नौका जितकी मजबूत होती तितकेच तिचे नावाडी कुशल होते. चारही शिडें उभारून वादळाला तोंड देत नौका निर्विघ्न चालली होती.

साहेब आतां उठून उभा राहिला होता. मूठ उगारून व्रजेश्वरच्या अंगावर तो चाल करून जात होता तोंच व्रजेश्वरनें त्याचा हात पकडला. त्याचा बाप मोठमोठ्यानें ओरडत होता. 'त्याला माफ करा साहेब!' म्हणून साहेबाला विनवीत होता. साहेबाला एक धक्का देऊन व्रजेश्वर बाहेर गेला. वावझड जोरांत होती पण पाऊस पडत नव्हता. रंगराजही बाहेर आला आणि केबिनीचें दार बंद करून दाराला पाठ लावून बसला.

दिवा उठून देवीपाशीं गेली. निशी उठली नाहीं. सर्वस्व कृष्णार्पण केलेल्या निशीला कुणाचीच भीति वाटत नव्हती. साहेब चिंताक्रांत झाला आहे असें पाहून निशी म्हणाली, "कसं काय साहेब? ज्यांना धरायला आलांत त्यांनीच तुम्हाला पकडलं. बायकांसमोर हार खावी लागली. आतां गोऱ्या लोकांत जाऊन तोंड कसं दाखवणार?" ती हरवल्लभला म्हणाली, "बाबूजी, आतां थोडीं झोंप घ्या. हीच आहे झोपायची वेळ. पुढं झोंप मिळायची नाहीं तुम्हाला."

"कां बरं?" हरवल्लभनें विचारलें.

"तुम्ही देवी चौधुराणीला पकडून द्यायला आलां होतां. तिला पकडून दिलं असतंत तर काय झालं असतं? ती फांशीं गेली असती. देवीनं काय तुमचं अनिष्ट केलं होतं? तुमच्या बेअब्रूचा प्रसंग आला असतांना पन्नास हजार रुपये देऊन तिनं तुमची इज्जत बचावली. ते उपकार असे फेडलेत! आतां तुम्हाला कोणती शिक्षा करावी?"

हरवल्लभ उगीच राहिला असें पाहून ती म्हणाली, "—म्हणूनच म्हणतें, कीं आज झोंप घ्या. ही नौका चालली आहे डाकिणीच्या स्मशानाकडे. तुम्हाला माहित आहे ना तें? ज्याचा जीव घ्यायचा असतो त्याला आम्ही तिथं नेतों.

तिथं साहेबाला फांशी देणार! आणि तुम्हाला काय करणार माहित आहे?— तुम्हाला सुळीं देणार!"

तें ऐकून हरवल्लभ टाहो फोडून रडूं लागला. बाहेर वादळाचा सोसाटा सुरू असल्यामुळें त्याचें तें रडणें व्रजेश्वरच्या कानीं गेलें नाहीं कीं देवीच्याही नाहीं. साहेब समोरच होता तो म्हणाला, "रो मत! लूक—मरना एक रोज अलबत है!"

साहेबाच्या उद्गाराकडे लक्ष न देतां निशीचे पाय धरून म्हातारा म्हणाला, "कुणी बचाव करायचा नाहीं का माझा? मी लाख रुपये देईन—"

"लाज नाहीं वाटत?" निशी म्हणाली, "पन्नास हजार द्यायचे चुकवावे म्हणून अशी कृतघ्नता केलीत आणि आतां लाखाच्या गोष्टी बोलतां?"

"तुम्ही सांगाल तें मी करीन—पण मला वांचवा." असें म्हणून हरवल्लभ तिच्या पायावर लोळण घेऊं लागला.

तो काकुळतीला येत होता. गयावया करीत होता. शपथांवर शपथा घेत होता. बेलभंडार उचलायला तयार झाला होता. निशी त्याला म्हणाली, "तुझ्यासारख्या फितुरी माणसाच्या शब्दावर विश्वास कुणी ठेवावा? व्रजेश्वरच्या माथ्यावर हात ठेवून शपथ घेशील?"

"नाहीं नाहीं!" तो ओरडला, "तेवढं मात्र होणं नाहीं."

पण ती अढी अगदीं क्षणिक होती. तो म्हणाला, "तेंही दिव्य करतों, पण मला वांचीव."

निशी म्हणाली, "तुझं दिव्य नको आहे मला. तूं आहेस आमच्या ताब्यांत—आतां ऐक—मी आहें एक कुलीनाची मुलगी. आमच्यांत लग्न होणं कठिण. कसंबसं माझं लग्न झालं, पण माझी धाकटी बहिण अजून लग्नाची आहे—"

"किती वय आहे तिचं?"

"पंचवीस—तीस." निशी म्हणाली, "तिच्या लग्नाचा फांस लागलाय मला. तुम्ही तिच्याशीं लग्न करा. म्हणजे राणीजीला सांगून मी सुटका करतें तुमची."

हरवल्लभनें सुटकेचा श्वास सोडला. एक लग्नच ना?—कुलीन ब्राह्मणाला काय त्याचें?—असेना का वयानें मोठी. त्यानें विचार करून उत्तर दिलें.

निशीचीहि तीच अपेक्षा होती. तो म्हणाला, " यांत कांहीं मोठं कठिण नाहीं. कुलीनाचं कुल राखणं हेंच कुलीनाचं काम आहे. तरीपण मी म्हणतों, मी म्हातारा झालोंय. आतां लग्न करणं मला शोभायचं नाहीं. माझ्या मुलाशीं तिचं लग्न लावून दिलं तर चालेल का ? "

" तो कबूल होईल ? " निशीनें विचारलें.

" मी सांगितलं कीं तो कबूल होईल. " तो म्हणाला.

निशी म्हणाली, " तर मग उद्यां सकाळीं तुम्ही तुमच्या मुलाला हुकूम दिलात, कीं तुम्हाला मेण्यांतून घरीं पाठवण्यांत येईल. तुम्ही पुढें जा आणि वधुवरांच्या स्वागताची तयारी करा. आम्ही तुमच्या मुलाचं लग्न लावून तुमच्या सुनेला त्याच्याबरोबर पाठवून देऊं. "

हरवल्लभला हातीं स्वर्ग आल्यासारखें वाटलें. सुळीं जायच्याऐवजीं लग्नाची वरात निघाली. त्यानें म्हटलें, " तुम्हीं जाऊन राणीजींना सांगा आतां. "

निशी आंत गेली. देवीनें तिला विचारलें, " माझ्या सासऱ्याबरोबर कसलं हितगुज चाललं होतं तुझं ? "

निशी म्हणाली, " तुमची सासु व्हायला मिळेल कीं काय तें पहात होतें. "

" ऐकलंस निशी, " देवी म्हणाली, " तूं आपलं मन, प्राण, जीवन, यौवन सर्वस्व कृष्णार्पण केलंस खरं, फक्त लबाडी तेवढी ठेवलीस स्वतःसाठीं. "

" चांगलं असेल तेवढंच देवाला द्यायचं. " निशी म्हणाली, " वाईट तेवढं रहातंच आहे आपल्यापाशीं. "

" जा मेले नरकांत ! " असें म्हणून देवी हंसली.

— ५ —

वादळ थांबलें. नौकाही थांबली. देवीनें खिडकींतून बाहेर पाहिलें—पहांट झाली होती. निशी म्हणाली, " आज देवी चौधुराणीचा अवतार संपला. आतां प्रफुल्ल आपल्या सासरीं जाईल. "

देवी म्हणाली, " अजून त्याला बराच वेळ आहे. सध्यां मी सांगतें तें ऐक. नौका बांधून ठेवायला सांग.—कुठं आलों आहों आपण ? रंगपूर किती लांब आहे ? भूतनाथ अजून किती दूर आहे ? "

रंगराज म्हणाला, "एका रात्रींत चार दिवसांची मजल गांठली आहे. रंगपूर इथून कांहीं दिवसाच्या वाटेवर आहे. भूतनाथ देखील एक दिवसाच्या वाटेवर आहे."

देवी म्हणाली, "इथं मेणा भोई मिळणं शक्य असलं तर माझ्या सासऱ्याला स्नानआन्हिकासाठीं किनाऱ्यावर सोडा."

दिवा म्हणाली, "एवढी घाई कां?"

निशी म्हणाली, "सासऱ्याचा मुलगा सारी रात्र बाहेर बसून राहिला आहे ना?"

निशीनें हरवल्लभ होता तिथें रंगराजला नेलें आणि म्हटलें, "आतां कांहीं सुळी द्यायचं नाहीं यांना. यांना पडाऱ्यांतून स्नानसंध्येसाठीं किनाऱ्यावर सोडा."

रंगराजनें ती व्यवस्था केली.

देवी निशीला म्हणाली, "साहेबाला आतां सोडून द्या आणि त्याला आतां रंगपूरला जायला सांगा. खर्चासाठीं त्याला शंभर मोहरा द्या."

साहेबाला पडाऱ्यांत ठेवून रंगराज घेऊन जायला निघाला त्यावेळीं हरवल्लभ घांटावर स्नान करीत होता. साहेबाला कुठें घेऊन जातां, म्हणून त्यानें विचारलें, तेव्हां रंगराज म्हणाला, "जंगलांत नेऊन त्याला फांशीं देणार." तें ऐकतांच हरवल्लभचा थरकांप झाला. त्याला संध्येचे मंत्र सुचेनासे झाले.

रंगराज साहेबाला घेऊन जंगलांत गेला आणि म्हणाला, "आम्ही कुणाला फांशीं देत नाहीं. आतां तुम्ही आपल्या घरीं जा. आमच्या वाटेला येऊं नका. तुम्हाला सोडून देण्यांत आलें आहे!—रंगपूर इथून बरंच दूर आहे. भाड्याची होडी करा किंवा गांवांत जाऊन घोडा किंवा मेणा घ्या. आमच्या राणीनं खर्चासाठीं तुम्हाला शंभर मोहरा दिल्या आहेत."

रंगराज मोहरा मोजून देऊं लागला तेव्हां साहेबानें त्यांतल्या पांच मोहरा घेतल्या आणि म्हटलें, "एवढ्याच पुरे आहेत मला. या मी कर्ज म्हणून घेतों आहें."

रंगराज म्हणाला, "तर मग असं करा, कीं तुमचा कुणी शिपाई जखमी झाला तर त्याला—किंवा कुणी मेला तर त्याच्या वारसाला—हे पैसे देऊन टाका म्हणजे आमचें हें कर्ज फेडल्यासारखं होईल. आमच्या राणीची कर्जफेडीची व्यवस्था आहे ती अशी."

साहेबाला त्याचें तें म्हणणें पटलें नाहीं, पण त्याबद्दल बरेंवाईट कांहीं न बोलतां तो निघून गेला.

रंगराज मेणा शोधायच्या उद्योगाला लागला.

आतां रस्ता मोकळा झाला आहे असें पाहून व्रजेश्वर देवीपाशीं आला. देवी म्हणाली, "तुम्ही आलांत तें बरं झालं. तुमच्या हुकुमाप्रमाणें सर्वांना जिवदान दिलं आहे. आज देवी चौधुराणी मेली—मात्र प्रफुल्ल अजून हयात आहे. तिनं रहायचं कीं देवीबरोबर जायचं ?"

व्रजेश्वर म्हणाला, "तूं आतां चल माझ्या घरीं. माझ्या घराला उजाळा येईल तुझ्यामुळं. तूं नाहीं आलीस तर मी घरीं जाणार नाहीं."

प्रफुल्ल म्हणाली, "मी घरीं आलें तर माझे सासरे काय म्हणतील ?"

"तें मी पाहून घेईन." व्रजेश्वर म्हणाला, "त्यांना आधीं पुढं जाऊं दे. आपण मागाहून जाऊं."

मेणाभोई आले. हरवल्लभनें थोडक्यांत स्नानसंध्या आटोपली.

निशीनें भरगच्च फराळाची तयारी करून त्यांना म्हटलें, "आतां तुमचं आमचं नातं जमलंय. आतां तोंड गोड केल्याशिवाय तुम्हाला जातां यायचं नाहीं. व्रजेश्वरची काळजी करूं नका. आतां ते माझे मेहुणे झालेयत. त्यांची काळजी आम्हाला आहेच. मी त्यांना बोलावून आणतें. आपलं जें ठरलंय तें त्यांना सांगून टाका."

व्रजेश्वर आला तेव्हां हरवल्लभ त्याला म्हणाला, "बाबा रे, तूं इथं कसा आलास तें कांहीं मला कळलं नाहीं. पण आलाच आहेस त्या अर्थी मी सांगतों. या बाई आमच्याच गोत्राच्या आहेत—कुलीन आहेत—यांची एक अविवाहित बहिण आहे. तिचं लग्न कुठं जमत नाहीं. कुलीनांची काळजी कुलीनांनीच घ्यायला हवी. मी त्यांना वचन दिलं आहें. तेव्हां तूं यांच्या बहिणीशीं लग्न कर."

व्रजेश्वरनें होकार दिला तेव्हां निशीला हंसण्याची उकळी आली होती, पण ती हंसली नाहीं.

हरवल्लभ म्हणाला, "आतां मेणा आला आहे. मी पुढें जाऊन तुमच्या स्वागताची तयारी करतों. तूं यथाशास्त्र विवाहविधि उरकून वधू घेऊन ये.

अधिक काय सांगू ? तूं सारं कांहीं जाणतोस. आपल्या दर्जाला शोभण्याजोगं देणं घेणं झालं पाहिजे हें विसरूं नकोस." असें म्हणून तो जायला निघाला.

तो निघून गेल्यावर व्रजेश्वर निशीला म्हणाला, " हें आणखी कसलं नाटक ? कोण तुझी धाकटी बहीण ?"

" कळलं नाहीं ?" निशी म्हणाली, " तिचं नांव प्रफुल्ल. धाकट्या बहिणी-ची सासू होतां येत नाहीं, नाहींतर तें देखील नातं जोडतां आलं असतं मला."

व्रजेश्वर म्हणाला, " ही तुझी युक्ति मला मान्य नाहीं. मी बापाला फसवणार नाहीं. मी घरीं जाईन आणि सारी हकिगत बापाला सांगेन."

निशीनें विचारलें, " पण प्रफुल्लला घरांत घेतील का ते ?"

व्रजेश्वर म्हणाला, " ती माझी जबाबदारी मी पार पाडीन."

तें ऐकून प्रफुल्लला समाधान वाटलें. आपला शब्द खरा करण्याची खात्री असल्याशिवाय व्रजेश्वर कसली जबाबदारी पत्करणार नाहीं याची तिला कल्पना होती.

आतां भूतनाथला जायची तयारी सुरू झाली. रंगराजला तिथूनच निरोप देण्यांत येणार होता. तें ऐकून रंगराज रडूं लागला. तो म्हणाला, "आम्हांला तुम्ही सोडून जाल असं आम्हाला कधींच वाटलं नव्हतं. आतां असं कसं म्हणतां ?"

रंगराजची समजूत घालून प्रफुल्ल म्हणाली, " देवीगडला माझं घर आहे. थोडा जमिनजुमला आहे. तो मी तुला दिला आहे. तिथं जाऊन सुखानं संसार थाट. यापुढं लाठीबाजींत पडूं नकोस. गरीबगुरीबांची राखण करीत जा. माझी सारी हकिकत भवानी ठाकूरनां जाऊन सांग. माझे त्यांना कोटी कोटी प्रणाम निवेदन कर."

रंगराजनें रडत रडत निरोप घेतला. दिवा आणि निशी देखील भूतनाथाच्या घांटापर्यंत पोंचवायला गेल्या होत्या. यापुढें त्याही देवीगडला राहणार होत्या.

नौकेवर जें जें म्हणून कांहीं मोलाचें होतें तें सारें प्रफुल्लनें दिवा आणि निशी यांनां बहाल केलें होतें. प्रफुल्लनें आपल्या अंगावरचे बहुमोल कपडे उतरूनही त्या दोघींना दिले तेव्हां निशी म्हणाली, " अशी उघडया अंगानं का सासरीं जाणार तूं ?"

व्रजेश्वरकडे बोट करून प्रफुल्ल म्हणाली, " हा एवढा एक दागिना पुरेसा आहे मला."

निशी ज्यावेळीं एका राणीकडे होती त्यावेळीं तिला त्या राणीनें दिलेले दागिने तिनें राखून ठेवले होते. ती ते घेऊन आली आणि म्हणाली, " आज तूं पहिल्यानं सासुरवाडीला जाते आहेस. तुला मी हा अहेर करतें आहें—"

तिच्यानें पुढें बोलवेना. दोघीही एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून फुलून फुलून रडूं लागल्या.

तीं सर्व मंडळी भूतनाथच्या घांटावर येऊन पोंचलीं. दिवा आणि निशी प्रफुल्लची पायधूळ घेऊन पुन्हां रडत रडत नौकेवर गेल्या. तिथून त्या देवी-गडला जाणार होत्या. सर्व नावाड्यांना भरपूर बक्षिस देऊन त्यांनाही निरोप देण्यांत आला. नौका सर्वांच्या ओळखीची असल्यामुळें वेळींच ती नष्ट करून टाकायचा तिनें हुकूम दिला.

— ६ —

भूतनाथच्या घांटावर प्रफुल्लची नौका येऊन उभी राहिली. गांवभर ओरडा झाला, कीं व्रजेश्वर आणखी एक लग्न करून आला आहे. वधू बरीच प्रौढ आहे. अर्थात् गांवची लहानथोर मंडळी वधू पाहण्यासाठीं घांटावर धांवत सुटली.

वरवधू दाराशीं आलीं. वधूनें डोक्यावरचा पदर पुढें दीडहात ओढला होता. ओवाळणी करतांना सासूबाईनीं बुरखा उघडून वधूकडे पाहिलें त्यावेळीं त्या चमकल्या. त्या नुसत्याच उद्गारल्या, " बरी दिसते आहे नवी सून ! "

पण सूनबाईनें तोंडावरचा बुरखा दूर केला नाहीं. तिला पाहण्यासाठीं आलेल्या गांवच्या लहानथोर मंडळीची निराशा झाली. नाराज होऊन सर्व लोक आपल्या घरीं गेले.

गांवच्या लोकांची गडबड मिटल्यावर व्रजेश्वरच्या आईनें त्याला बोलावून विचारलें, " ही नवरी तुला कुठं मिळाली रे बाबा ? "

व्रजेश्वर म्हणाला, " ही नवी नवरी नव्हे आई. "

आई म्हणाली, " तेंच मी म्हणतें आहें. हें हरवलेलं माणिक तुला कुठं मिळालं ? "

" देवाच्या दयेनं हें पुन्हां मिळालंय. " व्रजेश्वर म्हणाला, " सध्यां बाबांना कांही सांगू नकोस. मी संधि साधून त्यांच्याकडे सर्व खुलासा करीन. "

" तू सांगायला नको कांहीं ! " आई म्हणाली, " एकदां हे सर्व सोहाळे उरकून जाऊं दे म्हणजे मीच त्यांना सांगेन. "

शेवटीं व्रजेश्वरच्या आईनें हरवल्लभजवळ सारा खुलासा केला आणि म्हटलें, " माझी शपथ आहे तुम्हाला. यापुढं या बाबतींत तुम्ही एक शब्दही बोलूं नका. एकदां तुम्ही तोंड उघडलंत आणि त्यामुळं मुलगा गमावून बसायची पाळी आली होती. माझा हा एकुलता एक मुलगा—तो मला हवा आहे.—तुम्ही कांहीं कमीअधिक बोलाल तर मी गळ्याला फांस लावून घेईन. "

" बरं बरं, होऊन जाऊंदे तुझ्या मनासारखं ! " हरवल्लभ म्हणाला, " पूर्वीची गोष्ट कुणी काढूं नका. हें नवंच लग्न झालं आहे असाच सर्वांचा समज होऊं द्या. "

व्रजेश्वरच्या आईच्या धोरणी वृत्तीमुळें वातावरण निवळलें. सर्व कांहीं ठाकठीक झालें.

सागरला भेटण्यासाठीं प्रफुल्ल उत्सुक झाली होती. सासूबाईंनाही वाटत होतें, कीं तिन्ही सुना एकत्र याव्या. सागरला बोलावण्यासाठीं माणसें गेलीं. आपला नवरा आणखी एक थेरडी बायको घेऊ आला आहे हें ऐकून सागरला मोठा धक्का बसला.

सागर सासरीं आली. तिला नयनतारेनें नव्या सवतीबद्दल भलभलत्या कल्पना देऊन चिथावण्याचा प्रयत्न केला. त्या दोघी अजून समोरासमोर आल्या नव्हत्या.

सागर नव्या नवरीच्या शोधार्थ निघाली. नवी नवरी तलावाच्या घांटावर भांडीं घांशीत होती. सागर तिच्या मागून गेली आणि म्हणाली " काय ग, तूंच का ती नवी नवरी ? "

" आलीस का सागर ? " असें म्हणून नव्या नवरीनें मागें वळून पाहिलें तेव्हां सागर आश्चर्यचकित झाली. ती उद्गारली, " देवी चौधुराणी ? "

प्रफुल्ल म्हणाली, " देवी चौधुराणी मेली ! प्रफुल्लही मेली ! मी आहें नवी नवरी. आतां चल एका बाजूला, मी तुला सारं कांहीं सांगतें. "

सर्व हकिकत ऐकून घेतल्यावर सागर म्हणाली, " चांदीच्या सिंहासनावर बसून हिऱ्यामाणकांचा मुकुट मस्तकीं धारण करून राणीगिरी करणारी तूं, तुला

हें भांडीं घांसणं अन् केर काढणं रुचेल का? काव्य अन् शास्त्र यांचा कठिण अभ्यास केलेली तूं, ब्रह्मअत्याच्या कहाण्या तुला रुचतील का? हजार बरकंदाजांना हुकुम सोडणारी तूं, आतां हरीची आई आणि पारीची आई यांची का खुषामत करणार आहेस?"

प्रफुल्ल म्हणाली, "तें सारं कांहीं आवडलं म्हणूनच मी फिरून आलें. हा माझा संन्यास आहे. तें वैभव टाकून मी ही केरसुणी हातीं घेतली आहे—या माझ्या त्यागांतच स्त्रीधर्माची महती आहे."

रंगराज, दिवा, आणि निशी देवीगडला श्रीकृष्णाची उपासना करीत आयुष्य कंठित होत्या. भवानी ठाकूरच्या नशिबीं तें भाग्य नव्हतें. आतां इंग्रजांची राजवट झाली होती. जिकडे तिकडे स्थिरस्थावर झालें होतें. भवानी ठाकूरचें काम आतां संपलें होतें. त्यांनीं आपलें बंडाचें निशाण मोडून टाकलें.

भवानी ठाकूरच्या मनांत आलें, कीं आतां कृतकर्माचें प्रायश्चित केलें पाहिजे. तो इंग्रजांच्या स्वाधीन झाला. इंग्रजांनीं त्याला जन्मठेपेची शिक्षा फर्मावली.

अत्यंत समाधानी वृत्तीनें भवानी पाठक काळयापाण्यावर निघून गेले.



# आमचें नवें प्रकाशन

## बंकिमसाहित्यमाला

१ दुर्गेशनंदिनी
२ कपालकुंडला
३ मृणालिनी
४ विषवृक्ष
५ इंदिरा व युगलांगुरीय
६ चंद्रशेखर
७ रजनी व राधाराणी
८ कृष्णकांताचें मृत्युपत्र
९-१० राजसिंह ( भाग १ ला व दुसरा )
११ आनंदमठ
१२ देवी चौधुराणी
१३ सीताराम

ही ग्रंथमाला १३ पुस्तकांत गुंफली जाणार आहे. हिचें संपादन श्री. **मामा वरेरकर** करीत असून पहिलीं १२ पुस्तकें निघालीं आहेत व बाकीचीं पुढें चालू आहेत. **प्रत्येक पुस्तकाची किंमत २ रु.** ट. ख. निराळा.

**नवभारत प्रकाशन संस्था, मुं. ४**